# भारतीय साम्राज्य.

नारायण भवानराव पावगी.

यानीं रचिलें असें.

तें

पुणें येथें "इंदिरा" छापखान्यांत छापिलें.

शके १८२२

शार्वरीनाम संवत्सरे.

—:o:—



किंमत १ रुपया.

(५)

श्री

सद्गुरुचरणारविंदीं

नमन करून

ही

ग्रंथरूपी

यथाशक्ति व यथामति केलेली

अत्यल्प

# देशसेवा

## नारायण भवानराव पावगी

यानें

आपल्या दयितआर्यभूमीच्या ठिकाणीं

असलेल्या अत्युत्कट

प्रीत्यर्थ

सकल

आर्यभगिनींस व आर्यबांधवांस

प्रीतिपूर्वक

अत्यादरानें समर्पिली असे.



# भारतीय साम्राज्य.

## पुस्तक नववें.

### प्रस्तावना.

कामान्दुग्धेविप्रकर्षत्यलक्ष्मीम्
कीर्तिंसूतेदुष्कृतंयाहिनस्ति ।
तांच्याप्येतांमातरंमंगलानाम्
धेनुंधीराःसूनृतांवाचमाहुः ॥

( उत्तररामचरितम्. )

भारतीय साम्राज्य मालिकेंतील प्रस्तुतचें हें **नववें पुस्तक** होय.

ह्या मालिकेच्या पूर्वार्धाचीं सहा पुस्तकें असून, त्यांचा तपशील खालीं लिहिल्याप्रमाणें आहे.

१. आर्यदेश व तत्संबंधी वृत्तांत.

२. आर्यलोक व त्यांचें बुद्धिवैभव.

३. आर्येतिहास व भूगोल.

४. आर्यशास्त्र व कला.

५. आर्य शासन पद्धति व संस्था.

६. आर्य गृहस्थिति, नीति, शौर्य, व उन्नति.

उत्तरार्धाचीं एकंदर पंधरा पुस्तकें लिहिण्याचा संकल्प असून, त्यांचा तपशील सातव्या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत दिला आहे. ह्यापैकीं,

७. भरतखंडांतील मुख्यधर्म; आणि

८. भरतखंडांतील जातिवैचित्र्य;

अशीं लोकसेवेस यापूर्वीच सादर केलीं आहेत; आणि सदरीं निर्दिष्ट केलेल्या सांप्रतच्या पुस्तकांत,

९. भरतखंडांतील नानाविधभाषा *

---

* ह्यांत, भरतखंडांतील भाषांचें विवेचन करतानां, संस्कृत भाषेकडे मातृपदाचा बहुमान कशा रीतीनें आपोआप चालत येतो, याबद्दलचा ऊहापोह यथावकाश केला आहे.

संस्कृत भाषेच्या अतिप्राचीन किंवा मूळरूपाच्या संबंधानें डा. मूर म्हणतात,

"We are *driven*, whether we like it or no, *to look to* Sanskrit for the *oldest extant forms* and we do *undoubtedly find them there.*"

( Muir's Sanskrit Texts, Vol. II, P. 144 ).

त्याचप्रमाणें, अनार्य भाषेंतील पुष्कळ शब्द आर्य मूलात्मक, म्हणजे संस्कृतच आहेत, असें बीम्स लिहितात.

( पुढें चालू )

याविषयींचें सविस्तर विवेचन करण्याचें योजिलें आहे. ह्याचे एकंदर सहा भाग पाडले आहेत; व त्यांचा अनुक्रम मालिकेच्या आरंभापासून ज्या शेजेनें आला, तसाच धरला आहे. सबब, त्यांचा तपशील वाचकाच्या सोयीसाठीं येथें देतों. भाग १९. आर्य भाषांविषयीं सामान्य विवेचन. भाग १२. आर्य भाषेची जन्मभूमि. भाग १३. अतिप्राचीनकाळीं संस्कृत ही व्यावहारिक भाषा होती, असें मानण्यास कारणें. भाग १४. संस्कृत भाषेचें स्थित्यन्तर व तिचा अपभ्रंश. भाग १५. प्राकृत आणि इतर व्यावहारिक भाषांविषयीं सामान्य विचार. भाग १६. अनार्य भाषांविषयीं सामान्य निरूपण.

ह्या सर्व बाबतींचा विहंगमदृष्ट्या विचार करून, एकंदर वस्तुस्थिति चोहोंबाजूंनीं पाहतां, मी आपल्या शिरावर घेतलेला हा अशा प्रकारचा बोजा, केवळ साधारण किंवा

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

" But *this is admitted on all hands, that a very large proportion of their* ( Non-Aryan ) *Constituent parts is of Aryan origin.*"

( Beams' article. J. R. A. Society for 1870 Vol. V. P. 150 ).

सदहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत.

( ग्रंथकर्ता. )

अल्पस्वल्प नसून, तो निःसंशय माझ्या शक्ती बाहेरचा होय, असेंही मजला दिवसानुदिवस वाटूं लागलें आहे; आणि त्यासंबंधीं अनेक कारणांचा व कल्पनातीत गोष्टींचा प्रादुर्भावही वातावरणांत होत चालला आहे. सबब, माझी इच्छा पूर्ण होणें केवळ **श्रीसद्गुरुकृपेवरच** अवलंबून आहे, हें विशेष रीतीनें सांगावयास नलगे.

दुष्काळ व रोग, तदंगभूत नाना प्रकारच्या पीडा व यातना, असंख्य आधि व अगणित व्याधि, इत्यादि योगानें अखिल **भरतखंडास "त्राहि भगवन्"** झालें आहे. मग, अशा प्रकारच्या संत्रस्तावस्थेंत, आणि जेव्हां ह्या सेवकास क्षणभरही विश्रांति म्हणून कशी ती मिळालीच नाहीं, अशा वेळीं, निव्वळ मानासिक श्रमाचीं, आणि त्यांतही महत्वाचीं व **देशसेवेचीं** कामें, मजसारख्याच्या हातून तीं कशीं होणार ! अर्थातूच नाहीं. शिवाय, तीं खरोखर दुष्कर व नितान्त कठिण असल्यामुळें, होणें अगदींच दुर्घट होय; असें देखील मोठ्या कष्टानें मजला कबूल करणें भाग पडतें.

तथापि, मत्प्रिय बांधवांची मी आजपर्यंत कशीबशी, परंतु केवळ मनोभावानें केलेली सेवा त्यांस पसंत पडून, तिचा त्यांनीं मोठ्या प्रेमानें अंगिकार केला. इतकेंच नव्हें तर, प्रख्यात पंडित, आणि नामांकित विद्वज्जन,

यांनीं देखील तिचा सर्वतोपरी स्वीकार करून, मजला सर्व प्रकारें प्रोत्साहन दिलें, व या सेवकावर अनुग्रहही केला.

त्यामुळें, हातांत घेतलेलें कार्य तडीस नेण्याविषयीं, माझी इच्छा सहजींच प्रबळ होऊन, ती दुणावली. फार तर काय सांगावें पण, सेवाधर्माच्या दुःसह कष्टानें तप्त झालेल्या या कलेवरगृहास देखील त्या योगानें कांहींसें शीतलत्व येऊन, त्यांतील म्लान व मृतप्राय झालेल्या देशसेवेच्या शुष्क बीजांकुरांवरही, जणूकाय अमृत बिन्दूंची वृष्टीच झाली; आणि तेणेंकरून ते सजीव राहून, हें काम कसेंबसें व थोडेंबहुत तरी, शनैः शनैः, होत गेलें. मात्र, परवशतेमुळें, तें वेळीं अवेळीं झालें, याबद्दल वाचकांनीं मला क्षमा केली पाहिजे.

हें हातांत घेतलेलें कार्य तडीस जाण्यास, अनेक प्रसंगीं नानाविध अडचणी आल्या. परंतु, **श्रीमंगलमूर्तींच्या** केवळ **कृपाकटाक्षानेंच** त्या दूर होऊन, ही आरंभिलेली सेवा शेवटास गेली. सबब, त्याबद्दल त्या **श्रीसद्गुरूचे** अनन्त उपकार मानून, त्याच्या सदैव सान्निध्यार्थ हा शिरसाष्टांग प्रणाम करतों.

मुक्काम पुणें. रविवार,<br>ज्येष्ठ शुद्ध ६ शके १८२२<br>शार्वरीनाम संवत्सरे.

**नारायण भवानराव पावगी.**

---

# अनुक्रमणिका.

# भारतीय साम्राज्य.

## उत्तरार्ध.

## पुस्तक नववें.

## भरतखंडांतील नानाविधभाषा.

## भाग ५१ वा.

### आर्यभाषांविषयीं सामान्यविवेचन.

भरतखंडांतील जाति-वैचित्र्य, आणि भाषा-वैचित्र्य.

प्रस्तुत पुस्तकांत, हिंदुस्थानांत ज्या अनेक प्रकारच्या भाषा प्रचारांत आहेत, त्यांविषयींचें यथावकाश विवेचन करण्याचें योजिलें आहे. कारण, मागील पुस्तकांत येथील जातिवैचित्र्यासंबंधीं इतिवृत्तांत दिला असून, हें जातिवैचित्र्य ज्या कारणांनीं उद्भवलें, त्याच कारणांनीं भाषावैचित्र्य उदयास येण्यालाही अवकाश मिळाला. सबब जातिवैचित्र्यानंतर भाषावैचि-

त्याबद्दल निदान दोन शब्द तरी लिहिणें अगदीं अत्यवश्य आहे असें जाणून, तसें करितों.

तद्विवेचनविषयक भरतखंडांतील अनुकूलता.

आमचें भरतखंड ही एक अपूर्व पुराणभूमि आहे. त्यामुळें, ह्या पुण्य, पवित्र, आणि दिव्य आर्यमातेकडे आह्मांला निरंतर डोळे भरून पहावेंसें वाटतें; व तिच्या अवलोकनानेंच आम्हांला सदैव अत्यानन्द होतो. इतकेंच नव्हें तर, तिचें तें अक्षय्य व नानाविध भांडार पाहून आमच्या हृदयांत वारंवार प्रेमाचें भरतें येतें, आणि आह्मांला मोठें कौतुक व आश्चर्य वाटतें. कारण, थेट वरच्या मजल्यापासून तों तहत शेवटल्या पाहिरीपर्यंत, येथें सर्व कांहीं परिपूर्ण भरलेलें आहे. भाषाशास्त्र व शब्दोत्पत्ति, आत्मज्ञान किंवा वेदान्तविषय, धर्मशास्त्र आणि व्यवहारज्ञान, ज्योतिःशास्त्र व नृवंशविद्या, प्राणिविद्या व उद्भिद्विद्या, भूगर्भशास्त्र व स्थानिकस्वराज्य, न्याय व व्याकरण, गणित व रसायन, वृक्ष आणि वास्तुविद्या, विमानोड्डान व गायनकला, आणि आचार व नीतिशास्त्र, इत्यादींचें भरतखंड हें केवळ माहेरघरच आहे, असें कोण कबूल करणार नाहीं?

---

1 Vide Dr. Maxmuller's "what can India teach us?"

पूर्वार्ध, भारतीय साम्राज्य, पुस्तक दुसरें, भाग १२ वा, पान ७७ ते ८५ पहा.

संस्कृतभाषेचें इतर सर्व भाषांवर झालेलें ऋण.

प्रथमतः आमची अतिपुराण आर्यभाषाच घ्या. हिचें जेवढें म्हणून वर्णन करावें, तेवढें थोडेंच. आमच्या पूर्वज ऋषींनीं तिचें अत्युत्तम लालनपालन करून, तिचा फैलाव चोहोंकडे व्हावा अशा इच्छेनें, ते अवश्य त्या तजविजीस लागले असून, तिचा अमूल्य प्रसादही त्यांनीं सर्वत्र वाटला होता. त्यामुळें, तिचें वर्चस्व आम्हांलाचसें काय, पण अखिल भूतलावर ठायीं ठायीं प्रत्यक्ष भासमान होत आहे. कारण, ह्या भूमंडलावरील प्रत्येक राष्ट्र आणि प्रत्येक देश तिचा ऋणी आहे. इतकेंच नव्हे तर, त्या सर्वांवर तिनें जी आपली छाप बसविली आहे, ती आजमित्तीसही अगदीं जय्यत व कायम आहे.

संस्कृत भाषेचे श्रेष्ठ गुण.

ह्या संस्कृत भाषेची चारुता व सौन्दर्य, प्रौढता व मोहकत्व, गांभीर्य व व्यंजकत्व, रसवत्ता व माधुर्य, आणि तिच्यांतील प्रसाद व ओजस, इत्यादि सर्व गुण आपणांस जणूकाय मूर्तिमंतच भासतात; व आपल्याला प्रत्यक्ष दर्शन देण्यासाठींच ते दृग्विषयींभूत होतात. ह्या काळाच्या अनंतत्वांत, तिच्यावर आज हजारों वर्षें एकसारिखे अलंकारच चढत गेले आहेत; आणि तिला जणूकाय लावण्याची खाण करण्याच्या हेतूनेंच असंख्य मर्मज्ञ झटले होते कीं काय, असें भासतें.

वैदिककालांत, ती अगदीं बाल्यावस्थेंतच होती. त्यामुळें तत्कालीन स्थितींत ती अनलंकृत अशा एकाद्या मुग्धबालेप्रमाणें असल्याचें भासतें. तथापि, तितक्याही पुराणकाळीं, आमच्या **वैदिक ऋषींनीं** तिच्यांत कल्पनातरंगाची उत्तम प्रकारची मूस ओतली होती; आणि ही गोष्ट त्यांच्याच उक्तींकरून चांगल्या प्रकारें व्यक्त होते, यांत तिळमात्रही शंका नाहीं.

तिची वेद्कालीन स्थिति.

पुढें, कालान्तरानें, **वाल्मीकिसारख्या** कविवरांनीं तिला शनैः शनैः **वस्त्रालंकार** देऊन, मोठ्या प्रेमानें, परंतु योग्य विचारानें सजविण्याचा प्रयत्न केला; आणि तो पुष्कळ अंशानें सिद्धीसही गेला, असें अवश्य म्हणावें लागतें. कारण, ह्या वेळेपासूनच ती कांहींशी सरसावून, थोड्याबहुत प्रमाणानें तरी नांवारूपास येत चालली.

तिची रामायणकालीन स्थिति.

तदनन्तर, बरींच शतकें लोटलीं, व कालान्तरानें **व्यासमुनि**[1] अवतरले. ह्यांनीं अनेक ग्रंथ लिहिले; **महाभारत** रचलें; **भागवत** परिपूर्णतेस आणिलें; आणि **पुराणेंही**

तिची महाभारतकालीन स्थिति.

---

१ **वेद**कालानन्तर **रामायण**काल, आणि तदनन्तर **महाभारत**काल असून, त्या अनुरोधानेंच सदरचें विवेचन केलें आहे. भारतीय साम्राज्य, पुस्तक दुसरें. भाग १३।१४ पहा.

केलीं. त्या कारणानें, संस्कृत भाषेवर अनेक अलंकार चढले जाऊन, ती खरोखरच मनोहर दिसूं लागली.

तिच्या लालन पालनार्थ अन्य कविपुंगवांनीं केलेले प्रयत्न.

पुढें, पाणिनीसारख्या अतिकुशल लेपकारांनीं संस्कृत शब्दजालरत्नांचीं अमूल्य आणि अति सुबक रचना करून, त्यांचें एक ऐटदार, सुबक, मनोहर, व टुमदार असें कनकमय रत्नगृहच बनविलें. इतकेंच नव्हें तर, हें महामूल्य कोहेनूररत्न त्यांनीं अत्यन्त शोभायमान अशा सूत्रमण्यांच्या कोन्दणांतही बसविलें. तदनंतर, कालिदासासारख्या कित्येक कविवर मुकुटमण्यांनीं भरजरींचे गालीचे पसरून, ह्या रत्नखचित गृहांतच काव्यदोहन केलें; आणि अति रमणीय वचोविन्यास, व ललित वाङ्नवनीत काढिलें. कांहींनीं गद्यपद्य साहित्यादि सकल शास्त्रोदधींचें मंथन करून, उपलब्ध झालेल्या असंख्य मरकतमणिरत्नांच्या पेट्यांच्या पेट्या त्यांत भरून ठेविल्या. कित्येक पंडितभ्रमरांनीं त्यांत मधुकुंभ रिचवून, आपल्या सुमनोहर आणि मधुरतम गुंजारवानें पदलालित्याची अगदीं रेलचेल व कमाल करून सोडली. आणि राहिल्यासाहिल्यांनीं तर, आपल्या रसिकवाणीच्या लावण्य पुष्पमाला गुंफून, त्या देखील ह्याच रत्नगृहांत टांगून ठेविल्या. त्यामुळें, त्यांचा आमोद अखिल जगत्तलावर पसरून, त्यांच्या त्या विलक्षण व मोहक परिम-

लानें, सर्वांचें कुतूहल एकदम जागृत झालें. आणि जणू-काय त्यांचा अपहार करण्याच्या हेतूनेंच, सर्वांनीं आमच्या या दयितभूमीकडे मोरचा फिरवून, तिजवर एकदम हल्ला आणि गर्दी केली, व तिचें स्वातंत्र्य बुचाडून, त्या बिचाऱ्या माउलीला केवळ अन्नान्न करीत, दाही दिशा हिंडावयास लाविलें.

त्यामुळें तिची नितान्तरमणीयता, व त्या कारणानें तिचें झालेले हाल.

हर! हर! अशा वेळची आमच्या ह्या निरपराधी आर्यमातेची विलक्षण संत्रस्तावस्था पाहून, आम्हांला अत्यन्त वाईट वाटतें; व तिची ती दीन दशा मनांत येऊन, आमचें काळीज देखील अगदीं फाटून जातें. फार तर काय सांगावें पण, अति तीक्ष्ण उद्वेगयातनांनीं तें फारच सद्गदित होऊन, आमच्या नेत्रकमलांतून एकसारख्या गंगायमुनाच वहावयास लागतात; आणि त्यांचा प्रवाह कोणत्याही विचारांनीं रुद्ध म्हणून होतच नाहीं.

शिव! शिव! एकादी सुशिल आणि मनोहर अबला, अतिरूपवती व गुणवती असून, बहुत विनयसंपन्न आणि कनकमय असल्याकारणानें, तिजवर जसा एकादा पापात्मा बलात्कार करण्याचा प्रयत्न करितो; अथवा, तिजला त्राहिभगवन् करून सोडतो; तद्वतच, आमच्या आर्यमातेचें अक्षय्य व दिव्य रत्नभांडार पाहून, परकीयांनीं, जणूकाय तिजवर एकसारखी गर्दी

करून सोडली असावी; आणि तिचे नानाप्रकारानें छल करून, तिला एकसारखें भंडाविलें असावें, असें वाटतें.

विषयान्तर.

असो. पण, अनभिज्ञतेनें अकस्मात् बरेंच विषयान्तर झालें. सबब, त्याबद्दल वाचकांची क्षमा मागणें योग्य आहे. कारण, मनोविकारापुढें कोणाचेंही काडीमात्र देखील चालत नाहीं. आणि क्वचित् प्रसंगीं, तो तर इतका बलवत्तर व अनावर होतो कीं, त्याच्यापुढें आपल्याला अगदीं हातच टेकावे लागतात. आणि ज्याप्रमाणें,

जळ तुंबता तडागीं फोडावा लागतो जसा पाट ।

त्यांचीं कारणें.

त्याचप्रमाणें, एकदां का प्रेमाचा गहिंवर आला, म्हणजे गळा दाटतो; व आंसवांनीं नेत्र भरून येतात. आणि अशा स्थितींत, एक वेळ रडें कोसळून तुंबारा खुला झाल्याशिवाय निकालच होत नाहीं; किंवा आपल्या दुःखाचें निवेदन, ( मग तें अरण्यरुदितम् कां असेना, पण तें तरी ) अन्य कोणी ऐकणारें नसल्यास, निदान आपल्याशींच एकवार केल्यावांचून, मोकळेंसें वाटत नाहीं.

---

१. असे मनोविकार होणें अगदीं सहाजिक असून, ते सर्व काळीं, व सर्व स्थितींत, आणि हरएक मनुष्यावर आपला पगडा बसवितात. एक आंग्ल कवि म्हणतो.

Is there a man with soul so dead,
Who never to himself hath said—
" *This is my own my native land?* "

अस्तु. आतां, प्रस्तुत विषयाकडे वळतों. आर्य व अनार्य भाषांचें रूपान्तर कोणत्या अनुक्रमानें कसकसें होत गेलें आहे, हें अवलोकन करण्यास आमच्या भरतखंडांत जितकी अनुकूलता आहे, तितकी अन्यत्र कोठेंही नाहीं. आणि म्हणूनच, भाषातत्वज्ञ व नृवंशवेत्ते, शास्त्रनिपुण व अनेक भाषाकोविद, इत्यादिकांची आर्यमाता ही केवळ मृगयाभूमिच आहे, असें विद्वान शोधकांचें मत आहे.

सर्व भाषांचें मूळ उपलब्ध होण्यास, भरतखंड कारण.

इ० स० १८९१ सालच्या खानेसुमारीच्या आहवालांत बेन्सनें असें म्हटलें आहे कीं,

तद्विषयक बेन्सचें मत.

"India is, indeed, the happy hunting ground of the philologist, as it ought to become that of the ethnologist; for here we find language in every stage of its development; or to put it otherwise, forms of speech are here current which appertain to nearly every one of the main classes recognised in philology." ( P. P. 131-132. )

तेव्हां, इतकी अनुकूलता असून देखील जर आपण तिचा मुळींच उपयोग केला नाहीं तर, आपण आपल्या इतिकर्त-

तत्संबंधीं आपली इतिकर्तव्यता.

व्यतेला बिलकूल जागरूक राहिलों नाहीं, असा अर्थात्च दोष येईल. सबब, तो टाळण्याकरितां, मी अल्पस्वल्प व यथाशक्ति आपली सेवा बजावितों.

एकंदर भाषांचे मुख्य वर्ग, व त्यांची उत्पत्ति.

**भाषातत्त्वज्ञांनीं** एकंदर भाषांचे जे वर्ग केले आहेत, त्यांपैकीं मुख्य तीन होत. **१ आर्य, २ अनार्य,** आणि **३ शमी.** आर्यभाषा म्हणजे **संस्कृत** होय; व हिच्यापासूनच **आर्य**-शाखेंतील अन्यभाषा उद्भवल्या[१] आहेत. परंतु मुळांत आणि तदुद्भूत अनेक शाखांत, आजमित्तीस जमीन

---

१ असें आम्ही समजतों, व कित्येक पाश्चात्यही तसेंच मानतात. "The Brahmanical theory is that these ancient spoken dialects, or Prakrits, were corruptions of the purer Sanskrit."

(Hunter's Indian Impire. *P*, 334. Second Edition.)

मिस्तर कर्झन म्हणतो:—"*All the languages of the Aryan family*, and consequently all their *dialects*, *subdialects*, and *varieties, have been framed from a Sanskrit basis, and are only modified and corrupted forms of what was once the original tongue of the Aryan races of India.*"

( Vide Royal Asiatic Society's Journal. vol XVI. **P 181.**)

सदर्हू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत.

विशेष माहितीसाठीं, "**भारताचें भरतखंड अथवा आर्याक्रमणाचा मिथ्या प्रवाद**" नांवाचें ग्रंथकर्त्याचें पुस्तक पहावें. (भा. सा. पु. १६ वें पहा.)

( ग्रंथकर्ता. )

अस्मानाचें अंतर दिसून येतें. कारण, आर्यांच्या कित्येक शाखा त्यांजपासून विभक्त होऊन पश्चिम दिशेकडे वळल्या. कित्येक आपल्या आर्यावर्त जन्मभूमींतच राहिल्या. आणि कांहीं पूर्वाभिमुख झाल्या. त्यामुळें, कालान्तरानें, ह्या विविध आर्यशाखांत असंख्य अपभ्रंश होऊन, अगणित फेरफार झाले; व मूळभाषेंत आणि तिच्या शाखांत, कांहीं मागमूसही राहिला नाहीं. तथापि, मातृ, पितृ, भ्रातृ, दुहितृ, देव, अग्नि, उषस्, द्यौः, अयस्, पर्जन्य, इत्यादि अनेक संस्कृत शब्दांचे अपभ्रंश इराणी, ग्रीक, लाटिन, जर्मन, इंग्रजी, स्लॉव्हॉनिक्, पोलिश, आणि बोहीमिअन्, इत्यादि सर्व भाषांत, क्वचित् प्रत्यक्ष, क्वचित् पर्यायानें, व कांहीं कांहीं ठिकाणीं अगदीं सूक्ष्म भेदानेंच दृग्गोचर होतात. त्यावरून, सर्व आर्यभाषांचें मूळ संस्कृतच असावें, असें वाटतें.

आम्ही आर्य, व आमची संस्कृतभाषा, यांसंबंधानें पिक्टेट् असें म्हणतो कीं,

" While thus augmenting in numbers and in prosperity, that prolific race was labouring to create for itself, as a powerful means of development, a language admirable by its richness of its forms, a language in

१. भारतीय साम्राज्य, पु. दुसरें. पान ६ ते १० पहा.

which were spontaneously reflected all its impressions, not merely its mild affections and its simple admiration, but also its nascent aspirations toward a higher world; a language abounding in images and intuitive ideas, bearing within it, in germ, all the future affluence both of the most sublime poetry and of the most profound reflection. At first one and homogineous, that language already perfected to a very high degree, served as Common instrument of expression of this primitive people, as long as it continued within the limits of its native country." (A. Pictet Origines Indo-Europennes. P. P. 1-2)

असो. एकंदर आर्यभाषांत, संस्कृत ही सर्वोत्तम आणि सर्वश्रेष्ठ[१] भाषा आहे, याविषयीं आतां तिळमात्र देखील शंका किंवा मतभेद नाहीं. आम्ही पौरस्त्य[२] लोक तिच्या वैभवाविषयीं हवें तसें वर्णन करूं, यांत तर कांहींच नवल नाहीं. पण, पाश्चात्य देशांतील नामां-

---

1 "But Sanskrit was only *the most famous af* several Aryan dialects in the north"

(Dr. Hunter's Indian Empire P. 334.)

२ संस्कृतं नामदैवी वागन्वाख्यातामहर्षिभिः ।

(काव्यादर्श. १. ३३.)

कित पंडित[१] सुद्धां, तिचे सकौतुकाश्चर्य पोंवाडे गातात, हें विशेष ध्यानांत ठेवण्यासारिखें आहे. ह्यासंबंधाचें अवश्य तें विवेचन भारतीय साम्राज्याच्या पूर्वार्धांत, दुसऱ्या पुस्तकाच्या बाराव्या[२] भागांत केलें आहे. सबब, त्याबद्दलचा जास्त ऊहापोह, आणखी येथें करण्याची मुळींच अवश्यकता नाहीं.

---

१. संस्कृत भाषेविषयीं, सर विल्यम् जोन्स ह्मणतात कीं,

" It is of a wonderful structure; more perfect than the Greek; more copious than the Latin; and more exquisitely refined than either.

Sir William Jones. Asiatic Researchess. Vol. I. *P* 422 )

**संस्कृत** भाषेविषयीं **पिक्टेट्** म्हणतो, " किंबहुना, ही सर्वोत्कृष्टच भाषा आहे."

" The most beautiful perhaps of all languages,"

२ पानं ७३ तें ८५ पहा.

# भाग ५२ वा.

## आर्यभाषेची जन्मभूमि

### व

### तेथूनच तिच्या शाखांचा अन्यत्र विस्तार.

प्रस्तुत भागांतील विषय.

मागील भागांत, आर्यभाषांविषयीं फक्त सामान्यविवेचन केलें. सबब, प्रस्तुत भागांत, आर्यभाषेची जन्मभूमि कोणती, हें थोडक्यांत सांगून, तद्विषयक अवान्तर माहितीही प्रसंगानुसार देऊं.

आर्यभाषेची जन्मभूमि.

आतां, आर्य शब्द निःसंशय संस्कृत असून, भरतखंड म्हणजे संस्कृताची केवळ खाणच होय. आणि ज्याप्रमाणें, आर्य लोक भरतखंडांत[1] जन्म पावून चाऱ्ही दिशेला पसरले, व त्यांची मुख्य शाखा मात्र भरतखंडांत राहिली, त्याचप्रमाणें, संस्कृत भाषेचेंही झालेलें आहे. म्हणजे, मुख्य खोड भरतखंडांत राहून, त्याच्या पारंब्या मात्र

१ ह्यासंबंधानें ग्रंथकर्त्याचें "भारतांचें भरतखंड अथवा आर्याक्रमणाचा मिथ्या प्रवाद," नांवाचें पुस्तक पहावें. पु. १६वें

आमच्यापासून उद्भवलेल्या अनेक शाखांबरोबर सर्वत्र पांगल्या.

आर्यभाषा (संस्कृत), व तिच्या शाखा.

याप्रमाणें, **आर्यभाषे**चा जन्म **भरतखंडान्तर्गत आर्यावर्ता**तील असून, **आर्यभाषा** किंवा **संस्कृत** ही सर्वांचीच **मायभाषा** असल्याचें ठरतें. तेव्हां अर्थातच, हिच्यापासूनच **मराठी, हिंदी, बंगाली, गुजराथी, इराणी**, किंवा **झन्द**[२], **ग्रीक, ल्याटिन्, जर्मन्, इंग्रजी, पोलिश**, इत्यादि अनेक भाषा उद्भवल्या; आणि म्हणूनच तिचें ह्यांच्यांशीं **मायलेकींचें** नातें आहे, हें विशेष सांगावयास नलगे.

प्रस्तुत भागांतील विषयोपक्रम.

असो. प्रस्तुत पुस्तकांत, **आर्य** किंवा **संस्कृत** भाषेच्या संबंधानें, आपल्याला मुख्यत्वेंकरून खालीं लिहिलेल्या बाबतींचा अवश्य विचार केला पाहिजे.

१ अखिल **आर्यशाखांची संस्कृत** ही **मायभाषा** असल्याविषयींचें प्रमाण.

२ अतिप्राचीन काळीं, **संस्कृत** ही व्यावहारिक भाषा असल्याबद्दलचीं कारणें. आणि

---

१ ही गोष्ट कित्येक शोधक **पाश्चात्यांस** देखील कबूल आहे. ( कर्झन्. आशियाक राजकीय परिषद, पुस्तक १६ वें पहा. )

२ **झन्द** हा **छन्दाचा** अपभ्रंश असल्याचें दिसत असून, **छन्द** म्हणजे **ऋग्वेदां**त उपयोगांत आणिलेली पुराणतम भाषा होय.

(ग्रंथकर्ता).

### ३ संस्कृत भाषेचें स्थित्यंतर व तिचा अपभ्रंश.

आर्यभाषा व तिच्या शाखा.

आतां, प्रथमतः ह्या आर्यभाषेच्या संबंधानें आपण विचार करूं, आणि अखिल आर्य-शाखांची संस्कृत हीच माय-भाषा असल्याविषयीं, आमची प्राक्कालीन परंपरा कशी आहे; तसेंच, आम्हां आर्य हिंदूंपासूनच इतर आर्यशाखांचा प्रसार होऊन, त्या भिन्न भिन्न देशांत गेल्याकारणानें केवळ स्थलान्तरामुळेंच त्यांच्या निरनिराळ्या भाषा बनल्या, अशाबद्दल आमच्या पुराण ऋषींचें काय मत आहे, तें पाहूं.

आर्यराष्ट्रभिन्नत्वामुळें आर्यभाषांचें भिन्नत्व.

सकृद्दर्शनीं, ही गोष्ट सर्वांसच कबूल करावी लागेल कीं, लोकभेदानें, अथवा राष्ट्र-भिन्नतेमुळेंच, भाषाभिन्नता झाली. इतकेंच नव्हे तर, कालवशात हे निरनिराळे लोक ज्या ज्या ठिकाणीं जाऊन राहिले; अगर ज्या ज्या प्रदेशांत त्यांनीं आपली वस्ती केली; त्या त्या प्रदेशांतील परिवेष्टनानुरूपच भिन्न भिन्न भाषा प्रचारांत आल्या. तेव्हां, अनेक भाषांचें मूलकारण केवळ लोकच असल्यामुळें, ते कोणत्या देशांतून कोठें गेले, आणि कसकसे पसरले, हें अगोदर सांगून, तदनंतर त्या त्या लोकांच्या भाषांविषयीं यथावकाश विवेचन करूं.

आमचीं पुराणें व प्राचीन कथानकें यांचें अवलोकन

केल्यानें असें कळून येतें कीं, आमच्या आर्यवर्गापैकीं ज्या कित्येकांनीं आपला सनातन धर्म सोडला, ते जातिबहिष्कृत होऊन पतित व भ्रष्ट झाले; आणि तेच पुढें भिन्न भिन्न देशांत जाऊन तेथील स्थाईक रहिवाशी बनल्यामुळें, निरनिराळ्या नांवांनीं प्रसिद्धीस आले. इतकेंच नव्हे, तर त्यांच्या त्या नानाविध अवस्थांत व निरनिराळ्या स्थितींत भिन्न भिन्न परिवेष्टनांनीं हरएक बाबतींत फरक होत जाऊन, त्यांच्या मुळच्या प्रचारांत आणि विशेषतः भाषेंत तर महदन्तरच पडत गेलें.

आर्यराष्ट्र व आर्यलोक भिन्न भिन्न झाल्यामुळें निरनिराळ्या भाषांची प्रवृत्ति.

ह्याबद्दलचा प्रत्यक्ष दाखला आमच्या पारसीक बंधूंचाच होय. हे आणि आम्ही आर्य हिंदू, अगदीं नजीकचे व प्रत्यक्ष गोत्रज असतांही, केवळ कित्येक धर्मबाबतींतच त्यांचा आणि आमचा मतभेद झाल्याकारणानें, त्यांजला खरोखरचें देशान्तर करावें लागलें; व कित्येक स्थलान्तरें करून, अनेक देश हिंडत हिंडत, शेवटीं इराण देशांतच राहणें भाग पडलें[१]; आणि त्यामुळें त्यांची भाषाही निराळी बनली.

---

१ ह्या मतभेदाची आणि स्थलान्तराची इत्थंभूत हकीकत **भारतीय साम्राज्याच्या** उतरार्धांतील सातव्या पुस्तकांत दिली आहे. (भाग ४० वा. पान १०५ ते ११० पहा).

ह्यासंबंधानें, विष्णुपुराणांतील वचनही फारच महत्त्वाचें असल्यामुळें, त्यांतील अवश्य तितकें अवतरण, वाचकांस सुलभ रीतीनें पहावयास मिळावें एतदर्थ, येथें थोडक्यांत देतों.

तद्विषयक विष्णुपुराणांतील वचन, व म्लेच्छांचा उद्भव.

" स तथेति तद्गुरुवचनमभिनंद्य तेषां वेशान्यत्वमकारयत् । यवनान्मुंडितशिरसः, अर्धमुंडाञ्शकान्, प्रलंबकेशान्पारदान्, पल्हवांश्चश्मश्रुधरान्, निःस्वाध्यायवषट्कारान् एतानन्यांश्च क्षत्रियांश्चकार । तेच निजधर्मपरित्यागाद् ब्राह्मणैश्चपरित्यक्ता म्लेच्छतां ययुः ।

( विष्णुपुराण. अंश ४. अध्याय ३, २१ ).

याहीपेक्षां प्राचीनतर प्रमाण मनुस्मृतींतलें होय. हींत देखील स्वकर्मत्याग व क्रियालोप झाल्याकारणानें, आर्य वर्गांतील ब्राह्मण-क्षत्रियादि-जातींस हीनत्व येऊन, ते कालान्तरानें शक, यवन, चिनी, किरात वगैरे बनले, अशाविषयींचें वर्णन आहे.

मनुस्मृतींतलें वचन, आणि यवनांची उत्पत्ति.

शनकैस्तु क्रियालोपादिमाःक्षत्रियजातयः ।
वृषलत्वं गतालोके ब्राह्मणादर्शनेनच ॥ ४३ ॥

---

१ विष्णुपुराण, हें बरेंच प्राचीन असल्याविषयीं विल्सन्, कर्झन्, इत्यादींचें मत आहे.

पौण्ड्रकाश्चौड्रद्राविडाः कांबोजा यवनाः शकाः ।
पारदापल्हवाश्चिनाः किराता दरदाः खशाः ॥४४॥
( मनुस्मृति. अ. १०. )

महाभारतांतील दाखला.

ह्याच्याही पूर्वीचा दाखला **महाभारतांत** आढळून येतो; व त्यावरून **म्लेंच्छ, यवन,** इत्यादि भ्रष्ट जाती आम्हां **आर्य-हिंदूं**पासूनच कशा रीतीनें आणि केव्हां उत्पन्न झाल्या, हें चांगलें व्यक्त होतें.

एतद्विषयक कथानक जरासें मनोवेधक असल्या कारणानें, तें येथेंच थोडक्यांत देतों.

**ययाति** नांवाचा राजा **क्षत्रिय** कुळांत मोठा पराक्रमी होऊन गेला. हा **नहुषाचा** पुत्र होय. ह्यानें अखिल वसुंधरा सप्तद्वीपासहित जिंकून साम्राज्य भोगिलें, व तें **पुरु, यदु, तुर्वसु, द्रुह्यु,** आणि **अनु** नांवाच्या आपल्या पांच पुत्रांस वांटून दिलें.

ययातीची गोष्ट व

पुढें कालान्तरानें, ह्या **ययाति** राजास वृद्धावस्था प्राप्त झाली. त्यावेळीं, ती स्थिति दुःसह होऊन तिचा कंटाळा आल्यामुळें, त्यानें आपल्या **तुर्वसु** वगैरे पुत्रांस आपलें वार्धक्य घेण्यास सांगितलें, व त्या ऐवजीं त्यांचें तारुण्य आपणांस देण्याविषयींची आज्ञा केली. परंतु, ती गोष्ट त्यांपैकीं एकास देखील न रुचल्याकारणानें, त्यांनीं ती

नाकबूल केली. त्या योगानें, ययातीस अतिशय वाईट वाटून, आपल्या पोटच्या पोरांनीं देखील आपली अवज्ञा केल्याबद्दल त्यास मोठा क्रोध आला; आणि त्यानें त्यास असा शाप दिला कीं, तुमची प्रजा धर्मभ्रष्ट होऊन नाश पावेल.

यवन आणि म्लेंच्छ यांची उत्पत्ति.

त्याप्रमाणें, यदूपासून यादव झाले. तुर्वसुपासून यवन निपजले. द्रुह्यूपासून वैभोज उदयास आले. आणि अनूपासून म्लेंच्छ अवतरले.

यत्त्वं मे हृदयाज्जातो वयः स्वं न प्रयच्छसि ।
तस्मात् प्रजासमुच्छेदं तुर्वसो तव यास्यति ॥
संकीर्णाचार धर्मेषु प्रतिलोमचरेषुच ।
पिशिताशिषु चान्त्येषु मूढराजा भविष्यसि ॥
गुरुदारप्रसक्तेषु तिर्यङ्योनिगतेषुच ।
पशुधर्मिषु पापेषु म्लेंच्छेषु त्वं भविष्यसि ॥

(महाभारत, १, ३४७८).

यदोस्तु यादवा जाता स्तुर्वसोर्यवनाः स्मृताः ।
द्रुह्योः सुतास्तु वैभोजा अनोस्तु म्लेच्छजातयः ॥

(महाभारत, १, ३५३३).

रामायणांतील प्रमाण.

आतां, पल्हव, शक, यवन, कांबोज, बर्बर, इत्यादींच्या उत्पत्तीविषयींचा, याच्याही पूर्वीचा वृत्तांत रामायणांत आढ-

ळून येतो. परंतु त्यांतील कथाभाग याहून अगदीं भिन्न असल्यामुळें, तद्विषयक अवश्य तें विवेचन येथें थोडक्यांत करतों.

विश्वामित्राचें वृत्त.

फार प्राचीन काळीं, **विश्वामित्र** राजा मृगयासाठीं बाहेर फिरावयास गेला असतां, तो फिरत फिरत **वसिष्ठ** महामुनीच्या पर्णकुटिकेंत आला. तेव्हां, ह्यानें त्याचें आदरातिथ्य करून कंदमूलफळें भक्षणास दिलीं; आणि त्याचा विशेष सत्कार व्हावा एतदर्थ, त्यानें त्याच्याजवळ असलेल्या **शबल** नामक **कामधेनू**ची प्रार्थना केली. त्यावेळीं, तिनें पंचपक्वान्नादि षड्रसयुक्त नानाविध पदार्थ उत्पन्न करून, **विश्वामित्र** राजास तोषविलें, व **वसिष्ठ**मुनीच्या इच्छेप्रमाणें त्याचे हरएक प्रकारचे मनोरथ पुरविले.

ह्या गोष्टीचा **विश्वामित्र** राजाला मोठा चमत्कार वाटून, त्याची लालसा वाढली. इतकेंच नव्हें, तर अशा प्रकारची **कामधेनु** आपल्याला असावी, असेंही त्याच्या मनांत लागलीच आलें. सबब, त्यानें त्या संबंधाचा खुलासा **वसिष्ठास** विचारून, ती **कामधेनु** आपल्यास देण्याविषयींची प्रार्थना केली, आणि तिच्या ऐवजीं शतकोटी गाई देण्याबद्दल नानाप्रकारानें सांगितलें. परंतु त्यांपैकीं एकही गोष्ट त्या **महामुनीस** न रुचून, त्यानें आपल्या **कामधेनूस** देण्याचें साफ नाकारिलें, व म्हणाला,

*   *   *

न दास्यामीतिशबलां प्राह राजन् कथं चन ॥२२॥
एतदेव हि मे रत्नमेतदेव हि मे धनम् ।
एतदेव हि सर्वस्वमेतदेव हि जीवितम् ॥ २३ ॥
दर्शश्च पौर्णमासश्च यज्ञाश्चैवाप्तदक्षिणाः ।
एतदेव हि मे राजन् विविधाश्च क्रियास्तथा ॥
अतो मुलाः क्रियाः सर्वा मम राजन्न संशयः ।
बहुना किंप्रलापेन नदास्ये कामदोहिनीम् ॥२५॥
( रामायण, बालकाण्ड, सर्ग १३. )

कामधेनूचा छल.

याप्रमाणें, साम, दाम, दंड आणि भेद, यांचा काडीमात्रही उपयोग न होतां, शेवटीं नकारच मिळाला असें पाहून, विश्वामित्र राजास फार राग आला, व त्यानें ती **कामधेनु** केवळ बलात्कारानें आणि तिच्या मर्जीविरुद्ध आपल्या राजवाड्यांत नेली. परंतु, तिला तें राजबंधन न आवडून, ती पुनश्च **वसिष्ठा**कडे आली, व “ कांहीं अपराध नसतां मला तूं कां टाकून दिलीस,” म्हणून तिनें त्यास विचारिलें. त्यावेळीं, त्यानें तिला विशेष नम्रतापूर्वक असें कळविलें कीं, “ हे शबले! मी तुझा त्याग बिलकूल केला नसून, तुझ्याकडून देखील कांहीं अपराध झालेला नाहीं. परंतु, केवळ बळाच्या जोरावर उन्मत्त होऊन, राजा तुला घेऊन गेला, आणि मी बळहीन असल्याका-

रणानें माझें कांहींएक चाललें नाहीं, याबद्दल मजला फार वाईट वाटतें, व माझा अगदीं निरुपाय आहे."

हें ऐकून ती **कामधेनु** म्हणाली, "अरे वसिष्ठा, तूं आपलें स्वतःचें बल आणि **ब्रह्मतेज** कांहीं कमी समजूं नकोस. कारण, तें **क्षात्रप्रभावा**पेक्षांही खचितच अधिक आहे. सबब, मी तुला या कामीं साहाय्य करितें; व **विश्वामित्रा**चा दर्प मोडून, त्याच्या अक्षौहिणी सैन्याला हरताळ लावितें."

तिचें सामर्थ्य.

असें बोलून, तिनें तत्काल मोठा हंबरडा फोडला, आणि त्यासरशीच **पल्हव, शक, यवन, कांबोज, बर्बर,** इत्यादि नानाविध प्रबल प्रजा उत्पन्न करून, तिनें **विश्वामित्राच्या** सैन्याचा अगदीं संहार करून टाकिला.

शकयवनादींची उत्पत्ति.

**तस्य तद्वचनं श्रुत्वा सुरभिः सा सृजत्तदा ।**
**तस्या हुंभारवोत्सृष्टाः पल्हवाः शतशो नृप ॥ १८ ॥**

**भूय एवासृजद्घोराञ्छकान्यवनमिश्रितान् ॥**
**तैरासीत्संवृता भूमिः शकैर्यवनमिश्रितैः ॥ २१ ॥**

( रामायण, बालकांड. सर्ग ५४ ).

**तस्या हुंकारतो जाताः काम्बोजा रविसंनिभाः ॥**
**ऊधसश्चाथ संभूता बर्बराःशस्त्रपाणयः ॥ २ ॥**

योनिदेशाच्च यवनाः शकृद्देशाच्छकाः स्मृताः ।
रोमकूपेषु म्लेच्छाश्च हारिताःसकिरातकाः॥ ३ ॥

( रामायण, बालकाण्ड. सर्ग ५५ ).

सारांश.

याप्रमाणें, **रामायणांतील** सदरीं नमुद केलेल्या कथाभागावरून सुद्धां, **शक, यवन,** व **म्लेच्छादि** लोक, केवळ **भरतखंडांतच** उत्पन्न होऊन सर्वत्र पसरल्याचें चांगलें व्यक्त होतें.

तत्संबंधीं ऐतरेय ब्राह्मणांतील दाखला.

आतां, **अनार्य** व **दस्यु** लोक, आणि **अन्ध्र, पुण्ड्र, शबर, पुलिन्द, मूतिब,** वगैरे दूरदूरच्या उपान्तवर्ती व नानाविधजाती, कशा आणि कोणत्या कारणानें झाल्या, या विषयींचें एक चमत्कारिक कथानक **ऐतरेय ब्राह्मणांत**[1] आहे. त्यावरून, असें स्पष्ट दिसून येतें कीं, सदरहू पर्यंतवर्ती जाती **विश्वामित्रा**पासूनच उत्पन्न झाल्या. कारण, ह्याचे पन्नास पुत्र असून, ते आज्ञोल्लंघन करणारे निघाले. सबब, त्यानें त्यांचा धिःकार केला, व असा शाप दिला कीं, तुमची प्रजा प्रान्तानिवासी होऊन, सरहद्दीवरील फार लांबलांबच्या आणि जंगली प्रदेशांत राहील. पुढें हीच प्रजा **अन्ध्र, पुण्ड्र, शबर, पुलिन्द, मूतिब,**

१ **ऐतरेय ब्राह्मण ऋग्वेदाचे** होत. सबब, त्यावरून त्याचें प्राचीनत्व सहजीं ध्यानांत येईल. ( ७–१८ ).

इत्यादि नांवांनी प्रसिद्धीस येऊन, तिच्यापासूनच दस्यु[1] प्रजा देखील झाली.

ऐतरेय ब्राह्मणांतील मूळ संहिता खालीं लिहिल्या-प्रमाणें आहे.

व दस्यू वगैरेंची उत्पत्ति.

**तानन्वयाजहार। अन्तान् वः प्रजा भक्षीष्टेति। तएते अन्ध्राः पुण्ड्राः शबराः पुलिन्दा मूतिबा इत्युदन्त्या बहवो भवन्ति। वैश्वामित्रा दस्यूनां भूयिष्ठाः। ( ७. १८ ).**

सिंहावलोकन, व आर्यभाषेपासून इतर भाषांची उत्पत्ति.

याप्रमाणें, आम्हां आर्यांपासूनच भिन्न भिन्न लोक आणि निरनिराळीं राष्ट्रें उत्पन्न होऊन, तीं पृथक् पृथक् देशांत पसरलीं असल्याचें, सदरीं निर्दिष्ट केलेल्या प्रमाणांवरून उघड दिसतें; व त्यावरूनच आर्य भाषेपासून अन्यभाषा उद्भवल्या असल्याचेंही अनुमान होतें.

आर्यांचें क्रियाहीनत्व, व त्यामुळें दस्युपदप्राप्ति.

पूर्वीं दिग्दर्शन केल्या प्रमाणें, दस्यू म्हणजे क्रियाहीन व भ्रष्ट झालेले आमचे आर्य लोकच असून, हें कित्येक पाश्चात्यांसही[2] कबूल आहे. इतकेंच नव्हें तर, ती गोष्ट पौरस्त्य[3] प्रमाणांनीं देखील निर्विवाद सिद्ध होते. कारण,

---

१ पुढील पान २५ ते ३२ पहा.

२ **लासन्** ( Lassen ) प्रभृति.

३ **मनु, यास्क, सायण,** इत्यादि.

मनुस्मृतिकारांनीं **दस्यु** शब्दाची जी व्याख्या दिली आहे, तिजवरून, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, आणि शूद्र, या चातुर्वर्ण्यापासून च्युत झालेले ते **दस्यू** होत, असें स्पष्टच दिसून येतें.

**मुखबाहूरुपज्जानां या लोके जातयो बहिः ।**
**म्लेच्छवाच आर्यवाचः सर्वे ते दस्यवः स्मृताः ॥४५॥**

( मनुस्मृति. अ. १० ).

दस्युशब्दाची यास्कानीं दिलेली व्याख्या.

**यास्कांनीं दस्यु शब्दाची** व्याख्या खालीं लिहिल्याप्रमाणें दिली आहे.

**दस्यु दस्यच्च क्षयार्थादुपदस्यन्त्यस्मिन्नरसा उपदासयन्ति कर्माणि ।**

( निरुक्त. ७. २३ )

भावार्थः—दस्यु शब्द दस् ( = नाश करणें या ) धातूपासून निघाला असून, ते रसांची हानि व कर्मांचा विध्वंस करितात.

त्याचीच सायणांनीं केलेली व्याख्या.

**सायणाचार्यांच्या** मतें, **दस्यू** म्हणजे कर्मभ्रष्ट, कर्मांचा नाश करणारे, आणि अनुष्ठान करणारांचे शत्रू होत.

**अनुष्ठात्रीणामुपक्षपयितारः शत्रवः ।**

( ऋ. वे. १,५१,८, १,१०३,३. )

उपक्षपयित्रीन् कर्मविरोधिनो वलप्रभृतीनसुरान् ।
(ऋ. वे. १,३३,३.)

कर्मणामुपक्षपयित्रीर्विश्वा सर्वाः प्रजाः ।
(ऋ. वे. १,२९,२).

कर्महीनाः शत्रवः ।
(ऋ. वे. १,१०,१).

हाच शब्द वृत्र नामक चोराचा वाचक असल्याचें सायणानें एके ठिकाणीं लिहिलें असून, कित्येक ठिकाणीं त्याचा अर्थ असुर किंवा पिशाच होत असल्याविषयीं त्याचा अभिप्राय आहे.

उपक्षयकारिणमसुरं पिशाचादिकम् ।
(ऋ. वे. १,११७,२१).

बाधकानसुरान् ।
(ऋ. वे. ३,३४,९.)

तत्संबंधीं पाश्चात्य मत.

दस्यु म्हणजे भ्रष्ट झालेले आर्य होत, अशाविषयीं अनेक प्रमाणें असल्याबद्दल डाक्टर मूरला देखील केवळ निरुपायास्तव कबूल करणें भाग पडतें. आणि म्हणूनच त्यानें तद्विषयक उल्लेख आपल्या ग्रंथांत केला आहे. तथापि,

---

१ ह्या संबंधानें तो असें ह्मणतो कीं,

"It is true that, by the later authorities whom I have quoted, the *Dasyus* are regarded as *degraded* Aryans."

(Muirs Sanskrit Texts. vol II. P. 365. Second Edition).

दस्यु म्हणजे भरतखंडांतील मुळचे राहणारे रानटी लोक होत, अशी त्यांची कल्पना आहे. परंतु, तिला बळ-वत्तर प्रमाण असल्याचें दिसत नाहीं.

राँथचा अभिप्राय.

दस्यु शब्दाची व्याख्या प्रोफेसर राँथनें आपल्या कोषांत[1] दिली आहे. त्यावरून, देव आणि मनुष्यें यांच्यांशीं वैर करणारे जे अमानुष प्राणी, तेच दस्यू असल्याचें होतें. शिवाय, राँथ मजकूरचें आणखी असेंही मत आहे कीं, दस्यू शब्द अनार्यांचा[2] किंवा रानटी जातींचा बिलकुल वाचक नसून, तो तसा असल्याविषयीं मानणें देखील अगदीं रास्त नव्हे.

ऋग्वेदांत एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, " आपण आपल्यांत असलेल्या दस्यूनांच प्रथमतः जिंकू."

तुर्याम दस्यूंस्तनुभिः ।

(ऋ. ९,७०,२ ).

विश्वामित्रापासून दस्यूंची उत्पत्ति.

ऐतरेय ब्राह्मणांतही दस्यूंचा उल्लेख आला असून, त्यांच्या संबंधानें त्यांत असें लिहिलें आहे कीं, " बहुतेक दस्यू विश्वामित्रापासूनच उत्पन्न झाले आहेत."

---

1 Lexicon.

२ राँथनें आपल्या म्हणण्याच्या पुष्टीकरणार्थ ऋगवेदांतील दाखलाही रुजू केला आहे. ( १. ११७. २१; १. १०३. ३; १. ५१. ८; ७. ५. ६; २. ११. १८; ३. ३४. ९; १०. ४९. ३. )

**वैश्वामित्रा दस्यूनां भूयिष्ठाः ।**

(ऐ. ब्रा. ७,१८).

असो. सदरहू दोन्ही ऋचांची एकवाक्यता केली तर, **दस्यू** म्हणजे **भरतखंडांत**ले मुळचे राहणारे **अनार्य,** किंवा जंगली लोक नसून, ते भ्रष्ट झालेले व क्रियानष्ट **आर्य** लोकच होत, असें कोणाच्याही लक्षांत सहजीं येण्यासारिखें आहे.

आतां, **आर्य** म्हणजे कोण, व ते कोठले, याविषयींचें विवेचन येथेंच केलें पाहिजे.

आर्यांची व्याख्या,

कारण, ज्यांच्यापासून **दस्यू** उत्पन्न झाले, आणि ज्यांच्याबद्दलचें वर्णन **ऋग्वेदांत** ठायीं ठायीं दृष्टिगोचर होतें, त्या **आर्यां**बद्दलचा उल्लेख वाचकांच्या सोयीसाठीं, येथें वेळींच करणें अगदीं अत्यवश्य आहे.

सायणानें केलेली.

**सायणाचार्यांनीं आर्य** शब्दाची व्याख्या खालीं लिहिल्याप्रमाणें केली आहे.

१ **विदुषोऽनुष्ठात्रीन्** =विद्वान असून अनुष्ठान करणारे.

२ **विद्वांसःस्तोतारः** = विदग्ध असून स्तोत्र गाणारे.

---

१ ऋ. वे. सा. टीका. (१. ५१. ८). २ (१. १०३. ३). ३ (१. ११७. २१). ४ (१. १३०. ८). ५ (३. ३४. ९). ६ (६. २२-१०).

३ विदुषे. = शहाणे.
४ अरणीयं सर्वैं गंतव्यम् = सर्वांचें आश्रयस्थान.
५ उत्तमं वर्णं त्रैवर्णिकम्=त्रिवर्णात्मक अशी श्रेष्ठ जात.
६ कर्म युक्तानि = कर्म करणारे.

यास्कानें केलेली.

याच्याही पूर्वींचा व फार पुरातन टीकाकार म्हटला म्हणजे, सुप्रसिद्ध निघंटुकार यास्क होय. ह्यानें सुद्धां आर्य शब्दाची व्याख्या आपल्या वेदपरिभाषेंत दिली आहे. सबब, ती येथें नमुद करतों.

१ आर्या ईश्वरपुत्राः । = आर्य म्हणजे ईश्वरपुत्र किंवा जमिनीचे मालक होत.

आर्य व दस्यू यांची ऋग्-वेदांत दिलेली व्याख्या.

सर्वांत पुराणतम दाखला ऋग्वेदांतलाच असून, त्यांत देखील यज्ञादिक कर्म करणारे ते आर्य, आणि कर्म भ्रष्ट ते दस्यू, अशा विषयींचा स्पष्ट उल्लेख आहे.

त्वं न इन्द्र ऋतयुस्त्वानिदो नि तृंपसि ।
( ऋ. ८. ९९. १० ).

भावार्थः—हे इन्द्रा, तुला आमच्या ( आर्यांच्या ) यज्ञयागादि क्रिया आवडत असून, जे तुझा तिरस्कार करितात त्यांचें तूं पारिपत्य करितोस.

---

१ निरुक्त. ( ६. २६ ).

ह्याच्याच मुकाबल्याचे आणखीही थोडेसे दाखले, ऋचांतील प्रमाणांसहित देतों. म्हणजे त्यावरून, कर्म करणारे ते **आर्य**, आणि कर्मभ्रष्ट ते **दस्यू**, असें वाचकांच्या लक्षांत सहजीं येईल.

**अयज्वानः शनकाः प्रेतिमीयुः ।**

(ऋ. वे. १.३३.४.५).

" शनकांनीं यज्ञ न केल्यामुळें, ते प्राणास मुकले."

**पराचिच्छीर्षा विवृजुस्ते इन्द्र अयज्वानो यज्वाभिः स्पर्धमानाः ।**

(ऋ. वे. १.३३.४.५.)

" यज्ञ करणाऱ्या (आर्यां) जवळ, कर्मभ्रष्ट दस्यूंचें कांहींएक न चालल्यामुळें, ते आपलें तोंड लपवून पळून गेले."

**सुन्वद्भ्यो रन्धय कंचिदव्रतं हृणायन्तं चिदव्रतम् ।**

(ऋ. वे. १.१३२.४ ).

" कर्महीन मनुष्यास (मग त्यास क्रोध आला असला तरी) होम करणाऱ्या (आर्यां) च्या ताब्यांत ठेव."

**शाशस्तमिन्द्र मर्त्यमयज्युम् ।**

(ऋ. वे. १.१३२.४.)

" हे इन्द्रा! तूं यज्ञ न करणाऱ्यांचें शासन केलेंस."

**नि मायावानब्रह्मा दस्युरर्त ।**

(ऋ. वे. ४.१६.९.).

" कपटी व प्रार्थना न करणारा, म्हणजे स्तोत्र न

गाणारा, अथवा ब्रह्ममंत्र न म्हणणारा दस्यु प्राणास मुकला."

अपव्रतान् प्रसवे वावृधानान् ब्रह्मद्वेषः सूर्याद्यवयस्व ।

(ऋ. वे. ५.४२.९).

"ज्यांची प्रजा वाढत चालली आहे, अशा कर्महीन आणि धर्मभ्रष्ट लोकांस, व स्तोत्यांचा द्वेष करणारांस, तूं सूर्यापासून फार दूर ने."

सन्हांसो दस्युमव्रतम् ।

(ऋ. वे. ४.४१.२).

"व्रत न करणारे असे जे दस्यू त्यांस जिंकणारे आर्य."

सदरहू वरून, होमहवनादि क्रिया करणारे ते आर्य, आणि कर्मभ्रष्ट ते दस्यू, असें उघड होतें.

याहींपेक्षां विशेष महत्वाची ऋचा खालीं लिहिलेली होय. त्यावरून, आणखी असेंही जास्त दिसून येतें कीं, आमच्या आर्यांच्या ज्या ज्या क्रिया व जीं जीं शास्त्रोक्त कर्में असत, त्याविरुद्ध जें जें आचरण कोणी करीत, त्या सर्वांस आपल्या कळपावाहेरचे समजून, ते त्यांस अनार्य, किंवा दस्यू, अथवा दास मानीत.

अकर्मा दस्युरभिनो अमन्तरन्यव्रतोऽमानुषः ।
त्वं तस्यामित्रहन् वधर्दासस्य दंभय ॥

(ऋ. वे. १०.२२.७.८.)

" (हे इन्द्रा), दस्यू हे धर्मभ्रष्ट, कर्महीन, व क्रूर असून, ते आमच्या इच्छेविरुद्ध अन्य क्रिया करतात. सबब, हे शत्रुनाशका, सदरहू दासांचें पारिपत्य करून, तूं त्यांस शस्त्ररहित कर."

विजानी ह्यार्या न्येच दस्यवो
बर्हिष्मते रन्धय शासदव्रतान् ।
( ऋ. वे. ११. ८. ९ ).

" आर्य व दस्यू ह्यांस तूं ओळख; आणि हवन न करणारांचें पारिपत्य करून, त्यांस होम करणारांच्या ताब्यांत दे."

आर्यांपासूनच दस्यू व यवन वगैरे.

अस्तु. सदरीं नमुद केलेल्या प्रमाणांवरून, आमच्या आर्यांपासूनच दस्यू, यवन, म्लेंच्छ, कांबोज, पल्हव, दरद, शक, इत्यादि फैलावले असून, ते भिन्न भिन्न देशांत गेल्यामुळें भिन्न भिन्न नामधेय पावले; आणि त्या योगानेंच निरनिराळ्या भाषाही प्रचारांत आल्या; असें वाचकांच्या लक्ष्यांत सहजीं येईल.

आर्यांची जन्मभूमि.

आतां, ह्या विशाळ आर्यकुटुंबाची जन्मभूमि कोणती, आणि त्याचा विस्तार कोठून होत गेला, याविषयींचें थोडेसें दिग्दर्शन येथेंच करणें विशेष सोईचें आहे असें समजून, त्याबद्दलची किंचित हकीकत यथावकाश देतों.

आमचे पुराण आर्य मुळचे भरतखंडांतलेच असल्या-

तद्विषयक आमची परंपरेनें झालेली समजूत.

विषयीं आह्मीं निःशंक समजतों. इतकेंच नव्हे तर, स्वजन्मभूमिविषयक आजपर्यंतची आमची परंपरा देखील भरतभूमींतीलच आहे. त्यामुळें, आह्मां आर्यहिंदूंची व आबालवृद्धांची अशी ठाम कल्पना आहे कीं, आमचें जन्म ह्या पुण्यभूमींत होऊन, येथूनच आह्मी वाढीस लागलों; आणि येथूनच आह्मीं चोहोंकडे पसरलों. आह्मी आपलें बालपण, तारुण्य, व वृद्धावस्था येथेंच घालविली; आणि आम्हीं आपले आहारविहार, क्रीडाकौतुक, यज्ञयाग, होमहवन, पूजाअर्चा, इत्यादि नानाविध क्रिया देखील येथेंच केल्या. त्या कारणानें, आमचे आचारविचार, ज्ञानविज्ञान, कलाकौशल्य, श्रुतिस्मृति, देवदेवता, इत्यादींचा प्रत्यक्ष किंवा पर्यायाचा संबंध केवळ आमच्या भरतखंडाशींच असल्याचें उघड दिसतें. फार तर काय सांगावें पण, आमचे पौराणिक कथाप्रसंग, आमच्या देवादिकांचीं निवासस्थानें, त्यांचीं अति पूज्य मंदिरें, त्यांचीं विहारोद्यानें, त्यांच्या संचारवीथिका, व त्यांचीं नन्दनवनें, हीं यच्चावत हिमालयांत, त्याच्या प्रांतभागीं, अथवा त्याच्या निम्नप्रदेशांत, किंवा मेखलाप्रांतांत, आणि गगनचुंबिशिखरांवरच असल्याचें चांगलें व्यक्त होतें.

पुराणांवरून आमची जन्मभूमि भरतखंडच अस-

विष्णुपुराणांतील प्रमाण.

ल्याचें दिसतें. कारण, **विष्णुपुराणांत**, सृष्ट्युत्पत्तिनंतर, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, आणि शुद्र, हे चार वर्ण उत्पन्न केल्याविषयींचें वर्णन आहे. आणि ज्यापेक्षां हें चातुर्वर्ण्य आमच्या **भरतखंडां**शिवाय अन्यत्र कोठेंही नाहीं, त्यापेक्षां हें वर्णचतुष्टय येथेंच उत्पन्न होऊन, येथूनच तें व त्यांच्यापासून झालेली इतर भ्रष्टप्रजा इतस्ततः फैलावली जाऊन, ती देशान्तरीं गेल्याचें उघड होतें.

**प्रजाः ससर्ज भगवान् ब्रह्मा नारायणात्मकः ।**
**प्रजापति–पतिर्देवो यथा तन्मे निशामय ॥ २ ॥**
( विष्णुपुराण. १–४ )

**पद्भ्यामन्याः प्रजा ब्रह्मा ससर्ज द्विजसत्तम ।**
**तमः प्रधानास्ताः सर्वाश्चातुर्वर्ण्यमिदं ततः ॥ ५ ॥**
**ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याः शूद्राश्च द्विजसत्तम ।**
**पादोरुवक्षः स्थलतो मुखतश्चसमुद्गताः ॥ ६ ॥**
( वि. पु. १–६ )

स्मृतींतला आधार.

पुराणांपेक्षां प्राचीनतर ग्रंथ म्हटला म्हणजे **मनुस्मृति** असून, ह्यावरून देखील आमचा जन्म ह्या **भरतभूमींत**च झाल्याचें होतें. कारण, आमचें **मूलनिवासस्थान** व **जन्मभूमि** कोणती, याविषयींचा साद्यन्त दाखला **मनुस्मृतिकारांनीं** फारच खुलासेवार दिला आहे.

आम्हा आर्यांचा देश कोणता, याविषयींचा उल्लेख मनूनें प्रथमतःच थोडक्यांत करून, तो सर्वांस महशूर असलेल्या सुप्रसिद्ध **सरस्वती** आणि **दृषद्वती** नद्यांचा दरम्यानचा प्रदेश होय, असें त्यानें स्पष्टपणें सांगितलें आहे. इतकेंच नव्हें तर, हा देवनिर्मित देश असून, त्याला **ब्रह्मावर्त** म्हणतात, अशाविषयीं सुद्धां त्यानें दिग्दर्शन केलें आहे.

ब्रह्मावर्त.

**सरस्वती दृषद्वत्योर्देवनद्योर्यदन्तरम् ।**
**तं देवनिर्मितं देशं ब्रह्मावर्तं प्रचक्षते ॥ १७ ॥**

( मनुस्मृति. अ. २ ).

अशा प्रकारें आमच्या **मूलनिवासस्थानाचें मनुस्मृतिकारांनीं** वर्णन केल्यावर, आम्हां आर्यांची ही **जन्मभूमि** केवळ आजकालची नसून, ती **अनादिकालापासूनच** तशी असल्याबद्दल सर्वांस माहीत आहे, असें त्यांनीं सुचविलें. किंबहुना, सदरहू श्लोकांतील "**देवनिर्मितं**" शब्द, व पुढील श्लोकांतील **पारंपर्यक्रमागतआचारः**," या शब्दांनींच तें त्यांनीं ध्वनित केलें, असेंही ह्मणण्यास हरकत नाहीं.

आमच्या जन्मभूमीचें अनादिकालीनत्व.

असो. याप्रमाणें, **आर्यांच्या** वसतिप्रदेशाचें सामान्य दिग्दर्शन करून, त्यांच्या आचारविचारासंबंधीं देखील **मनूनें थो-**

आचारविचारांचें अनादिकालीनत्व.

डक्यांत सांगितलें; आणि हा आचारविचार **आर्यदेश** व **आर्यलोकां**प्रमाणेंच अति प्राचीन आणि **अनादि** आहे, असें त्यानें लिहिलें.

**तस्मिन्देशे य आचारः पारंपर्यक्रमागतः ।**
**वर्णानां सान्तरालानां स सदाचार उच्यते ॥१८॥**

( मनुस्मृति. अ. २ )

**भावार्थः**—ह्या प्रदेशांतील ( म्हणजे सुप्रसिद्ध **सरस्वती** आणि **दृषद्वती** नांवाच्या देवनिर्मित नद्यांच्या दरम्यानच्या प्रांतांतील ) आचार, अगदीं **अनादि**काळचा व परंपरेनें चालत आलेला असून, तो फार पवित्र आहे. आणि ब्राह्मणक्षत्रियादि चार वर्णांपासून तों थेट **संकीर्ण** जातीपर्यंतही तो पाळण्यांत येतो.

ब्राह्मणांपासून जगास मिळालेलें शिक्षण.

आतां, **सरस्वती** व **दृषद्वती** ह्या सुविख्यात नद्या **हिमालयाच्या** दक्षिणेस असून, **ब्रह्मावर्ताचें** वर्णन झाल्यावर **ब्रह्मर्षि** देश कोणता, हें **मनुस्मृतींत** थोडक्यांत सांगितलें आहे. त्यावरून, **ब्रह्मर्षि** देशांत **कुरुक्षेत्र, मत्स्य, पांचाळ,** आणि **शूरसेन,** इत्यादींचा समावेश होत असल्याचें उघड होतें. इतकेंच नव्हें तर, क्षत्रियादि वर्णांस व ह्या जगत्तलावरील अखिल मानवांस, हरएक आचारविचारासंबंधीं शिक्षण, या **भरतखंडां**तल्या **ब्राह्मणां**पासूनच मिळालें असल्याचें स्पष्ट दिसतें.

कुरुक्षेत्रंच मत्स्याश्चपंचालाः शूरसेनकाः ।
एषब्रह्मर्षिदेशोवै ब्रह्मावर्त्तादनन्तरः ॥ १९ ॥
एतद्देश प्रसूतस्य सकाशादग्रजन्मनः ।
स्वंस्वं चरित्रं शिक्षेरन् पृथिव्यां सर्वमानवाः २०

(मनुस्मृति. अ. २.)

**भावार्थः**—ब्रह्मावर्त्तानन्तर **ब्रह्मर्षिदेश** लागतो; आणि ह्यांतच **कुरुक्षेत्र, मत्स्य**देश, **पांचाळ**देश, व **शूरसेनक**, यांचा समावेश होतो.

ह्या प्रदेशांत उत्पन्न झालेल्या **ब्राह्मणां**पासूनच, पृथ्वीवरील सर्व मनुष्यांस, ज्यांच्या त्यांच्या पृथक् पृथक् आचारविचारांचें शिक्षण मिळालें.

ह्यावरून, आह्मां **आर्यांची** जन्मभूमि **भरतखंडच** असल्याचें उघड दिसतें; आणि ही गोष्ट वर नमूद केलेल्या प्रमाणांवरून, अगदीं शाबीत ठरते.

यज्ञार्हदेश व त्याच्या पलीकडील म्लेंच्छ देश.

शिवाय, **आर्यावर्ता**चें **वर्णन** केल्यानन्तर, **मनुस्मृति**कारांनीं **यज्ञार्ह** म्हणजे यज्ञ करण्यालायक देश कोणता, हें थोडक्यांत सांगितलें; व सदरीं जे जे देश नमुद केले, त्या

१ **आर्या** अत्रावर्तन्ते पुनः पुनरुद्भवंतीत्यार्यावर्त्तः । (कुल्लूक भट्टाचार्यकृत मनुस्मृतीवरील टीका पहा.)

(म. स्मृ. अ. २,२२.

पलीकडील सर्व टापू म्लेंच्छ समजावयाचा, असें त्यांनीं लिहिलें.

**कृष्णसारस्तु चरति मृगोयत्र स्वभावतः ।**
**सज्ञेयो यज्ञियो देशो म्लेच्छ देशस्त्वतः परः॥२३॥**

( म. स्मृ. अ. २ ).

मनुस्मृतीवरून भरतखंडांतच आर्यांची उत्पत्ति.

ह्याखेरीज, **आर्य** लोकांची उत्पत्ति भरतखंडांतच झाली असल्याविषयीं, **मनुस्मृतींत** आणखी एक प्रत्यक्ष प्रमाण मिळतें. सबब, त्याचाही येथेंच उल्लेख करणें अवश्य आहे. **मनूनें** एके ठिकाणीं स्पष्टपणें असें म्हटलें आहे कीं, ह्या **देशांत** जन्म पावलेल्या **ब्राह्मणां**पासूनच पृथ्वीवरील सर्व **मनुष्यांस**, ज्यांच्या त्यांच्या पृथक् पृथक् आचारविचारांचें शिक्षण मिळालें. त्यावरून, **भरतखंडा**व्यतिरिक्त अन्यत्र कोठेंही आमची जन्मभूमि नाहीं, असें वाटतें.

**एतद्देशप्रसुतस्यसकाशादग्रजन्मनः**
**स्वंस्वंचरित्रं शिक्षेरन पृथिव्यांसर्वमानवाः ॥२०॥**

( मनुस्मृति. अ. २. )

तद्विषयक पाश्चात्यांचें मत, व त्याचें निराधारत्व.

आतां, कित्येक **पाश्चात्यां**ची अशी समजूत आहे कीं, आम्ही **आर्य** लोक **भरत**बाह्य देशांतून **भरतखंडां**त आलों, आणि येथील लोकांस जिंकून आम्हीं आपली नूतन वस्ती

ह्या **भरत**भूमींत केली. परंतु ह्या कल्पनेस बलवत्तर असें प्रमाण कोणतेंही नाहीं. येवढेंच नव्हे तर, **भरतबाह्य** प्रदेशांतून केवळ आगन्तुकाप्रमाणें येऊनच जर आम्ही येथें राहिलों असतों तर, " **परकीयांचा देश दुसराच आहे,**" ( म्लेच्छ देशस्त्वतः परः । )[2] असें आम्ही कधीं देखील खचितच ह्मटलें नसतें.

वेबरची कबुली.

आह्मी **आर्य भरत**बाह्य प्रदेशांतून भरतखंडांत आलों असल्याबद्दल, आमच्या ग्रंथांत अथवा ग्रंथांतरीं काडीमात्रही दाखला नाहीं, असें **वेबर**नेंही कबूल केलें आहे.

" In the picture just now drawn, positive signs are, after all, almost *entirely wanting*, by which we could recognise the country in which our forefathers dwelt and had their common home. "

( Modern Investigations on Ancient India[3] p. 10. )

---

१ ही गोष्ट **पाश्चात्य** देखील कबूल करितात, व ती **वेबर, स्पीजेल, मूर, काँवेल, मॅक्समुलर, एल्फिन्स्टन,** इत्यादि नांवाजलेल्या विद्वानांच्या ग्रंथांवरून वाचकांच्या लक्षांत सहजीं येईल.

२ मनुस्मृति. अ. २, २३.

३ सदरहू व पुढील अवतरणांतील इतालिकवर्ण आमचे आहेत.

( ग्रंथकर्ता. )

स्पीजेल्चा अभिप्राय.

स्पीजेल म्हणतो कीं, हिंदू, पारसीक, ग्रीक, रोमन, जर्मन, इत्यादि सर्व, आर्य-कुटुंबाच्या शाखा होत. परंतु, त्यांचें मूलनिवासस्थान कोणतें, हें बिलकूल निश्चित झालें नसून, तें केव्हांही निश्चित होण्याचा संभवच नाहीं.

" All these nations ( Indians, Persians, Greeks, Romans, Germans, Slavonians, and perhaps also the Celts ) are branches of one single original family, whose abodes *have not yet been certainly determined*, and perhaps *will never be ascertained in a way to preclude all dispute.* "

मूरचें मत.

मूरची अशी स्पष्ट कबुली आहे कीं, हिंदूंच्या पुराणतम-ग्रंथांत देखील, ते भरतबाह्य प्रदेशांतून भरतखंडांत आल्याचा यत्किंचितही उल्लेख नाहीं.

" I must, however, begin with a *candid admission* that, so far as I know, *none* of the Sanskrit books, *not even the most ancient, contain any distinct reference or allusion to the foreign origin* of the Indians. "

( Muirs' Sanskrit Texts. Vol. II. p. 322. Second Edition ).

प्रोफेसर कॉवेल तर असें स्पष्टपणें लिहितो कीं, भाषेंतील साम्य हें एकप्रकारचा संबंध मात्र दाखवितें. परंतु, तें कोणत्या स्थळीं आणि केव्हां घडून आलें, याबद्दलचा निर्णय, त्यावरून, कोणत्याही प्रकारें करितां येत नाहीं.

कॉवेलचें ह्मणणें.

" This similarity and linquistic sympathy proves only the fact of a connection; *but they prove nothing regarding the place where it subsisted, nor about the time.* "

मॅक्समुलरचेही अशाच मासल्याचे उद्‌गार असून, तो असें म्हणतो कीं, हे **आर्य** कोठून आले व ते प्रथमतः कोठें राहिले होते, हें कोणाला सुद्धां निश्चित करतां येत नाहीं.

मॅक्समुलरचे उद्‌गार.

" But *no one can now determne* the *exact spot whence they came*, and *where they* had *been previously settled.* "

( Last Results of the Turanian Researches. p. 340 ).

सुप्रसिद्ध इतिहासकार एलफिन्स्टन्चें असें मत आहे कीं, **आर्यहिंदू** हे **भरतखंडा**बाहेरून आले होते, अथवा **भारते**तर देशांत ते राहिले होते, असें मानण्यास कांहीं एक

एलफिन्स्टन्चे विचार.

कारण नसून, ते कदाचित् अतिप्राचीनकाळीं, **भरतखंडां**-तलेच मुळचे रहिवाशी असतील.

"The question therefore is still open. There is *no reason whatever for thinking* that the Hindus *ever inhabited ang country* but their present one ; and *as little for denying* that they have done so before the earliest trace of their records or traditions."

( Elphinstone's History of India ).

तथापि, कित्येक **पाश्चात्यांचें असें ठाम** मत आहे कीं, अखिल **आर्य** कुटुंबाची केवळ **भरतखंडच** जन्मभूमि असून, तद्व्यतिरिक्त ती अन्यत्र कोठेंही नाहीं.

क्रूझरचें मत.

**क्रूझर[1]** नांवाचा एक **फ्रेंच** पंडित म्हणतोः—

"If there is a country on earth, *which can justly claim the honour of having been the cradle oj the human race,* or at least the scene of primitive civilization, * * * *that country assuredly is* India."

**मॉन्सियर. लुई जेकोलियट्[2]** नांवाचे दुसरे एक **फ्रेंच**

---

१ **भारतीय साम्राज्य.** पु० २ रें पान २ पहा.

२ **भारतीय साम्राज्य** पुस्तक ३ रें. प्रस्तावना. पान २—३—४ पहा. तसेंच, ( M. Louis Jacolliot's La Bible Dans L'Inde, or Bible in India ).="**भरतखंडांतीलपवित्र शास्त्र**" नांवाचें पुस्तक पहा. (P. P. VII. VIII ).

लुईजेकलियटचा अभिप्राय.

शोधक असें लिहितात कीं, सर्व राष्ट्रांचें आदिस्थान भरतभूमिच होय. येथूनच हरएक शास्त्राची उत्पत्ति झाली. येथूनच सर्वांस कायदेकानू मिळाले. येथूनच सर्वांस धर्मबंधन प्राप्त झालें. नीतिशिक्षण देखील येथूनच उदयास येऊन, तें अखिल जगास मिळालें. आणि मानवी कुटुंबाच्या यच्चावत् शाखा देखील येथूनच सर्वत्र पसरल्या.

बर्कचे विचार

इंग्लंडांतील सुप्रसिद्ध बर्क[1] नांवाचा वक्ता, पार्लमेंटांतील सभासदांस उद्देशून, त्यांस असें कळवितो कीं, " अहो ! बड्या अर्तीचे सभासद हो, हिंदू हे भरतखंडांतील मुळचे रहिवाशी लोक होत. "

कर्झनचें मत-

कर्झननें[2] तर असें स्पष्ट लिहिलें आहे कीं, आर्यहिंदू हे आर्यावर्त्तांतलेच मुळचे रहिवाशी होत. इतकेंच नव्हे तर, ह्यांच्याच कुटुंबांतील शाखा पश्चिमेकडे सर्वत्र पसरून,

---

१ " My Lords, these Gentoo people *are the original people* of Hindustan."

( Burke Vol. vii. p. 46 )

ह्यांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ( ग्रंथकर्ता. )

2 Journal Royal Asiatic Society. vol. XVI.

त्यांच्या भाषेचे पोटभेद, किंवा त्यांचे अपभ्रंश, त्या त्या शाखांबरोबर इतस्ततः प्रचारांत आले आहेत.

कर्झन् म्हणतोः––

" *On the contrary the facts above delineated point to the conclusion that the rise,* progress advance in the arts and civilization of this *remarkable people* (Aryans), *are the growth of their own land* ( Aryavrta ), developed during the course of long ages, and *communicated to other nations.*" P. 199.

* * * * * * * * *

" I venture ta affir*m*, that *they* ( other languages such as Zandic. Greek, Latin, Gothic, &c. ) *have all sprung, at different chronological periods, from the* Sanskrit, ( that is, the Vaidic Sanskrit ). " P. 177.

(सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत.)

( ग्रंथकर्ता. )

असो. अशा प्रकारचे अनेक दाखले दाखवितां येतील. परंतु, विस्तारभयास्तव तसें करितां येत नाहीं. सबब, पुढील विवेचनाकडे वळतों.

महाभारतांतील प्रमाण

आतां, महाभारत हें मनुस्मृतीच्याही पूर्वीचें असून, त्यावरून देखील, आर्यांची उत्पत्ति भरतखंडांतच झाली असल्याचें दिसतें. कारण, त्यांत गुणकर्मविभागाप्रमाणें

**ब्राह्मणक्षत्रियादि** चार वर्ण उत्पन्न केल्याबद्दलची हकीकत **श्रीकृष्णभगवानानें अर्जुनास** सांगितली असून, ही **वर्णसंस्था** केवळ **भरतभूमींतलीच** असल्याविषयीं अगदीं निर्विवाद आहे.

**चातुर्वर्ण्यं मयासृष्टं गुणकर्म विभागशः ।**
**तस्य कर्त्तारमपिमां विध्द्य कर्तारमव्ययम् ॥१३॥**

( भगवद्गीता. अ. ४. )

रामायणांतील दाखला.

याहीपेक्षां **पुराणतर** दाखला **रामायणांतील** होय. आणि त्यावरून असें निःसंशय दिसतें कीं, युगान्तरीं सुद्धां, **भरतखंडालाच** काय तें एकान्त विश्रान्तीचें स्थान मानीत असत. इतकेंच नव्हे तर, देवादिकांस देखील तेंच एक निवासस्थल होऊन राहिलें होतें. कारण, येथेंच तपश्चर्या-करण्यासाठीं, **वामन** आवताराच्याही पूर्वीं, **विष्णूनें** एक पवित्रस्थान शोधून काढून, तेथें तपश्चर्या केली, व तेंच पुढें **सिद्धाश्रम** नांवानें सुप्रसिद्धीस आलें, अशाविषयीं एक आख्यायिका आहे.

**इह राम महाबाहो विष्णुर्देव नमस्कृतः ।**
**वर्षाणि सुबहूनीह तथायुग शतानिच ॥ २ ॥**
**तपश्चरण योगार्थमुवास सुमहातपाः ।**
**एषपूर्वा श्रमोराम वामनस्य महात्मनः ॥ ३ ॥**

( रामायण. बालकाण्ड. सर्ग २९. )

ऋग्वेदांतील पुरावा.

सर्वांत प्राचीनतर प्रमाण म्हटलें म्हणजे **ऋग्वेदांतील** होय. सबब, तेंच विशेष महत्वाचें जाणून, तिकडे क्षणभर वळूं, आणि आह्मां **आर्यांचें भरतखंड** हेंच अनादि कालापासूनचें निवासस्थान आहे, अशाबद्दलचा कांहीं दाखला मिळाला तर पाहूं.

आर्यांसाठीं, पाणी, भूमि, व प्रकाश यांची निर्मिति.

**ऋग्वेदांतील** एका ऋचेंत असें ह्मटलें आहे कीं, **इन्द्रानें** आपल्या उज्ज्वल मित्रांसहित **आर्यांस** भूमि, सूर्य, आणि पाणि दिलें.

**सनत्क्षेत्रंसखिभिःश्वित्न्येभिःसनत्सूर्यंसनदपःसुवज्रः**

( १. १००. १८. )

ह्यावरून, असें उघड होतें कीं, **इन्द्रानें** निर्माण केलेल्या भूमींतच आह्मी उत्पन्न होऊन, सृष्टपदार्थांचें यथार्थ अवलोकन होण्यासाठीं, त्यानें आह्मांला सूर्याचा प्रकाश दिला, राहण्याकरितां जागा दिली, व पिण्यासाठीं पाणी दिलें.

आतां, **इन्द्र** ही केवळ **आर्यहिंदूंचीच** देवता असून, तिचा प्रत्यक्ष संबंध केवळ **भरतखंडाशींच** असल्यामुळें, आह्मी **भरतभूमींतच** उत्पन्न झालों असल्याचें निर्विवाद होतें.

परंतु, कोणी कदाचित् अशी शंका घेईल कीं, फक्त सदरीं नमूद केलेल्या ऋचेवरूनच **हिंदू भरतखंडांतच**

प्रथम निर्माण झाले, असें खात्रीपूर्वक म्हणतां येणार नाहीं. सबब, माझ्या ह्मणण्याच्या विशेष पुष्टीकरणार्थ, आणि माझ्या प्रतिपादनाचें योग्य रीतीनें समर्थन व्हावें यासाठीं, आणखी एका ऋचेचा आधार वाचकापुढें ठेवितों.

**( स वृत्रहा इन्द्रः ) अजनयद् मनवे क्षामपश्चेत्यादि ।**

( ऋ. वे. २, २०,७ )

ह्यावरून, इन्द्रानें **मनू**साठीं, भूमि व पाणी उत्पन्न केल्याचें उघड होतें. इतकेंच नव्हें तर, **मनु** हा सर्व **आर्य**शाखांचा, किंबहुना अखिल मानवी कुटुंबाचा प्रपितामह आणि जनिता असल्याकारणानें, व **मनु**, **इन्द्र**, आणि **भरतभूमि**, यांचा निकट व अनादि संबंध असल्यामुळें, आम्ही **भरतखंडांत**च जन्म पावलों असल्याचें निःसंशय ठरतें.

तथापि, कित्येक विद्वान आणि बहुश्रुतवाचक हे याही ऋचेवर आक्षेप घेतील, व असें प्रतिपादन करतील कीं, ज्यापेक्षां सदरहू ऋचेंत भूमीचा उल्लेख नाहीं, त्यापेक्षां केवळ **मनु** अथवा **इन्द्र** शब्दावरूनच **आर्यां**ची जन्मभूमि **भरतखंड**च आहे, असें सिद्धवत् मानणें बरोबर होणार नाहीं. यासाठीं, ह्या शंकेचेंही निरसन होण्याकरितां ज्या ऋचेंत **भरत**भूमींतील स्थलनिर्देश केला आहे, अशीच एक ऋचा नमुद करतों.

**उताक्षितिभ्योऽवनीरविन्दः ।** (ऋ० वे० ६,६१,३)

सरस्वती नदीचा प्रदेश.

ही ऋचा **सरस्वती** नदीला अनुलक्षून असून तींत असें म्हटलें आहे कीं, ( हे सरस्वती ) " तूं मनुष्यासाठीं, म्हणजे ) **आर्यां**करितां ), भूमि संपादन करून दिलीस."

आतां, ही **सरस्वती** नदी **उत्तरहिंदुस्थानांत** असल्यामुळें, **आर्यां**च्या जन्मभूमीविषयीं शंका राहत नाहीं, आणि ह्या नदीच्या आसपासच्या प्रांतांतच ते उत्पन्न झाल्याबद्दल निर्विवाद ठरतें.

तिचें स्तनपान.

हीच **सरस्वती** नदी **आर्य**बालकांस उदकरूपी स्तनपान देऊन, त्यांचें सर्वतोपरि कल्याण करते, अशाविषयीं आणखी एका ऋचेंत वर्णन आहे.

**यस्तेस्तनः शशयोयोमयोभूर्येन विश्वापुष्यसिवार्याणि।**
**योरत्नधावसुविद्यः सुदत्रः सरस्वति तमिहधातवेकः ४९**

(ऋ. वे. अ. २. अ. ३. व. २३. मं. १. अ. २२. सू. १६४.)

**भावार्थः**—हे **सरस्वति**! तुझा स्तन पूर्ण भरलेला असून, तो सुखदायक आहे. कारण, तो फार उदार असून, तो आह्मांला धन देतो, आणि आमची संपत्तिही वृद्धिंगत करतो. सबब, हाच स्तन आह्मांस प्यावयास दे. अर्थात्, तुझ्या कल्याणकारक पात्रांतून आह्मांला विपुल पाणी दे, असा ह्या ऋचेचा इंगितार्थ होय, हें उघड आहे.

सप्त सिन्धूचा प्रांत.

आणखी एका ऋचेंत, सोमाला अनुलक्षून असें ह्मटलें आहे कीं, हे सोमा, इन्द्रानें तुझ्याशीं सख्य करून तुझ्या साहाय्यानें आर्यमनूसाठीं उदक निर्माण केलें. त्या कारणानें, सप्तसिन्धू वाहत राहून पाण्याचीं द्वारेंही खुलीं झालीं.

त्वायुजातवतत्सोम सख्य इन्द्रो अपो मनवे सस्रुतस्कः।
अहन्नहिमरिणात्सप्तसिन्धूनपावृणोदपिहितेवखानि।१।

(ऋ. वे. अ ३. अ. ६. व १७. मं ४. अ ३. सू २८–३२४).

ह्या ऋचेंत नमुद केलेल्या सप्तसिन्धू म्हटल्या ह्मणजे प्रचंड सिन्धुनद, व झेलम, रावी, चीनाब, बियाज, सतलज, आणि सरस्वती, अशा नद्या होत.

सदरहू सर्व प्रमाणांवरून, आह्मां आर्यांची जन्मभूमि भरतखंडच असल्याचें निःसंशय होतें; आणि पूर्वीं सांगितल्याप्रमाणें येथूनच आह्मीं सर्वत्र पसरल्याचें अनुमान सिद्धवत् ठरतें.

आर्यभाषेपासून संस्कृत आणि प्राकृत भाषेची उत्पत्ति.

आतां आर्यभाषेच्या संबंधानें, भाषाभिज्ञांचे हल्लीं जे अगदीं नूतन शोध सुरू आहेत, त्यावरून असें दिसून येतें कीं, आमच्या आर्य लोकांनीं आपापल्यांत परस्परांचे विचार प्रदर्शित करण्यासाठीं कांहीं विशेष संज्ञा मुद्दाम ठरविल्या; आणि त्याअन्वयें,

एक सर्वसाधारण आर्यभाषा प्रचारांत आली. तदनंतर, शब्दमाधुर्य, अर्थगांभीर्य, व पदलालित्य, यांविषयीं जसजशी उत्कट इच्छा, नैसर्गिक लालसा, आणि प्रसादकुतूहल, इत्यादि आपोआप जागृत होत गेलीं, तसतशी तिच्यांत शब्दजालांची शनैः शनैः नवीन भर पडत जाऊन, तिला विलक्षण सौन्दर्य प्राप्त होत चाललें. पुढें कविरत्न मुकुटमणी, अनेक विद्वान, आणि पंडितसमूह, इत्यादींनीं देखील तिची यथार्थ सेवा करून, तिच्यावर अत्युत्कृष्ट अलंकार चढविण्याचें मनांत आणिलें; व तिला अत्युच्च स्थानापन्न करण्याचा त्यांनीं जणूकाय विडाच उचलला. त्यामुळें, त्यांच्या ह्या भगीरथ प्रयत्नांस संपूर्ण यश येऊन, त्यांच्या त्या अव्याहत श्रमानें ती अगदीं परिपक्व दशेप्रत पावली.

अशा प्रकारें, विद्वज्जनांच्या उत्कट प्रयत्नांनीं अनेक संस्कार होऊन, जी आर्यभाषा केवळ पूर्ण व उन्नतावस्थेला पोहोंचली, ती आपोआपच संस्कृत बनली. आणि कालान्तरानें, केवळ अपभ्रंश झाल्यामुळें जिचें रूपान्तर झालें व जी अपभ्रष्ट स्थितींत राहिली, ती अर्थातूच प्राकृत व अन्य भाषेंत मोडू लागली.

संस्कृत भाषेच्या युरोप व आशियाखंडांतील शाखा.

युरोपखंडांतील ग्रीक, लाटिन्, जर्मन, इंग्रजी, इत्यादि भाषा देखील संस्कृताच्याच शाखा असून, आशिया-

खंडांतील पल्हवी (पालीभाषा), सिन्धी, पंजाबी, मराठी, गुजराथी, हिन्दी, बंगाली, उरीय, इत्यादि तदुद्भूत अशा अपभ्रष्ट किंवा प्राकृत भाषा होत. सबब, तत्संबंधीं आणि इतर व्यावहारिक भाषांबद्दल पुढें स्वतंत्र रीतीनें विवेचन करूं.

मायभाषा संस्कृत, व तिच्या पोटशाखा.

**संस्कृत** ही **आर्य** कुटुंबांतील सर्व शाखांची मायभाषा असून, तिच्यापासून **मराठी, हिंदी, बंगाली,** इत्यादि **पौरस्त्य** शाखा व **झन्द, ग्रीक, ल्याटिन्, इंग्रजी,** वगैरे **पाश्चात्य** शाखा उद्भवल्या असल्याचें, मागें सांगितल्याप्रमाणें, अनेक प्रमाणांवरून दिसून येतें.

ऋग्वेदांत दृष्टिगोचर होत असलेली संस्कृतची बाल्यावस्था.

**संस्कृत** भाषेची प्राथमिक अवस्था हीच तिच्या मूळस्वरूपाचें खरें द्योतक होय. आणि तिची बाल्यदशा, तिचें साधें परिधान, व तिचा मुग्धपणा, इत्यादि सर्व पूर्वस्थितीचीं लक्षणें **ऋग्वेद** ऋचांत उत्तमप्रकारें व्यक्त होतात.

संस्कृतांत दृष्टीस पडत असलेलें इतर भाषांचें मूळ.

शिवाय, **भरतखंडांतील प्राकृत**भाषा, अथवा **आशियाखंडांतील झन्द**भाषा, किंवा **यूरोपखंडांतील ग्रीक, ल्याटिन्, इंग्रजी,** इत्यादि भाषा घेऊन, आपण त्यांतील शब्दांची मीमांसा केली, आणि शब्दव्यु-

त्पत्ति शास्त्राच्या नियमांस अनुसरून कित्येक शब्दांचें मूळ शोधून काढिलें, तर तें आपणांस खचित **संस्कृत** भाषेंतच दृष्टिगोचर होतें. फार तर काय सांगावें पण, पितृवाचक, मातृवाचक, आणि परस्परांच्या नात्याचा संबंध दर्शविणारे शब्द, यांचें मूळ तर प्रत्यक्ष **संस्कृत** भाषाच असल्याचें आढळून येत असून, तें अन्यत्र कोठें सुद्धां, व अन्य कोणत्याही भाषेंत दृग्गोचर होत नाहीं.

संस्कृताच्या पौरस्त्य व पाश्चात्य शाखांच्या स्थित्यन्तराचें विषदीकरण.

आतां, **संस्कृत** भाषेपासून आर्यमूलाच्या इतर **पौरस्त्य व पाश्चात्य** शाखा कशा उद्भवल्या, आणि मुळच्या **संस्कृत** शब्दांत कसकसें व कोणत्या प्रकारें स्थित्यन्तर होत गेलें, हें वाचकांच्या ध्यानांत सहज रीतीनें आणि थोडक्यांत येण्यासाठीं, याखालीं कोष्टकवार खुलासा नमुद करतों.

संस्कृत

शाखा. शाखा.

| पाश्चात्य शाखा | | | | मूळ | पौरस्त्य शाखा | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| इंग्रजी. | ल्याटिन. | ग्रीक. | झन्द. | संस्कृत. | मराठी. | हिंदी. | गुजराथी. |
| फादर | पेटर | पटीर | पतर | पितर | पिता, बाप | बाप. | बापा |
| मदर | मेटर | मीटीर | मातर | मातर | माय, आई | मा | मा |
| ब्रदर | फ्रेटर | फ्रेट्रिया | ब्रातर | भ्रातर | भाऊ | भाई | भाई |
| डॉटर | ० | युगतीर | दुघ्‌धर | दुहितर | ० | ० | ० |
| ० | ० | दएर | ० | देवर | दीर | दियर | दियर |
| सिस्टर | सोरोर | ० | कण्हर | स्वसर. | ० | ० | ० |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| [illegible] | [illegible]युरस | न्युऑस | ० | स्नुषा | सून | ० | ० |
| ० | सोसर. | हेक्युरास | कशुर | श्वशुर | सासरा | ससरा | ससरा |
| सन् | ० | हूइयास | हूनु | सूनु | ० | ० | ० |
| ह्युमरल | ह्युमरलस् | ० | ० | तुमुल | तुंबल | तुंबळ | धमाधमी |
| ० | मेलस. | मीलॉस | ० | मल | मळ | मैल | मेल |
| पेल | पाल्लिडस. | पोलीयॉस | ० | पलित | पांढरा | ० | ० |
| ० | ० | केलॉस | ० | कल्य,कल्याण | कल्याण | कलाण | कलाण |
| स्वीट | स्वविस | हीडुस | ० | स्वादु | स्वादिष्ट | सवादिष्ट | सवादिष्ट |
| मिडल् | मीडिअस | मीसॉस | मैध्य | मध्य | मध्य,मधला | मधवच | मधवच |
| हाफ् | सेमी | हेमि | ० | सम | सम | सम | सम |
| न्यू | नोव्हस | निऑस | नव | नव | नवीन | नवा | नवूं |
| डेक्स्टीरिटी | डेक्स्टर | डेक्सीऑस् | दषिण | दाक्षिण्य | दक्षता | दक्षता | दक्षता |
| सेम | सिमिलिस | होमॉस | हम | सम | सारखा | सारखा | सरखूं |
| बार्बरस् | बर्बरस् | बर्बरॉस् | ० | बर्बर. | ० | ० | ० |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| फुल् | प्लीनस | प्लिऑस | ० | पूर्ण | पूर्ण | पूरन् | पूरण |
| ० | सिक्कस | ० | हुस्क | शुष्क | सुकें | सुका | सुकुं |
| माक्सिमम् | माक्सिमस् | मेगिस्टॉस | ० | महिष्ठ | मोठा | मोटा | मोटो |
| मेजर | मेजॉर | मीझॉन् | ० | महीयान् | महान् | ० | ० |
| ० | मॅग्नस | मेगस | ० | महान् | मोठा | मोटा | मोटा |
| यूथ | जुव्हेनिस् | ० | यवन् | युवन् | ज्वान | जुवान | जवान |
| ० | क्यापट | केफलें | ० | कपाल | कपाळ | कपाल | कपाळ |
| फर्स्ट | प्रायमस् | प्रोटॉस | फ्रातेमो. | प्रथम | पहिला | पेहेला | पेहेलो |
| टू | ड्युओ | ड्युओ | द्व | द्वि | दोन | दो | बे |
| थ्री | ट्रेस | ट्रेइस | थ्रायो | त्रयस | तीन | तीन | त्रण |
| फाइव्ह | क्किंकी | पेंटा | पंचन् | पंच. | पांच | पांच | पांच |
| सिक्स् | सेक्स | हेक्स् | क्ष्वस | षट् | सहा | छे | छ |
| सेव्हन् | सेप्टेम् | हेप्टा | हप्तन | सप्त | सात | सात | सात |
| एट् | ऑक्टो | ऑक्टो | अस्तन् | अष्ट | आठ | आठ | आठ |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| नाईन् | नोव्हेम् | हेनिआ | नव | नव | नऊ | नव | नव |
| टेन् | डिसेम् | देक | दशन् | दशन् | दहा | दस | दस |
| ट्वेंटी | विजिंती | ईकोशी | विंशैति | विंशति | वीस | बीस | वीस |
| हन्ड्रेड | सेन्टम् | हेकटाँन् | शतेम | शतम् | शंभर | सो | सो |
| टेअर | ० | डेरो | दर | दर | फाडणे | फाड | फाड |
| स्टॅण्ड | स्टो | हिस्तेमि | हिस्नामि | तिष्ठामि | थांबतों | ठेरताहै | ठेरेछे |
| नोन् | नोटम् | ग्नोटाँस | ० | ज्ञात | जाणलें | जाना | जाण्युं |
| सर्पेंट् | सर्पेन्स | हिर्पीटाँन् | ० | सर्प | साप | साप | साप |
| विंड् | व्हेंटस | ० | वात | वात | वारा | वा | वा |
| माइंड | मेन्स | मीनाँस | मनः | मनस् | मन | मन | मन |
| व्हाँमिट् | व्होमो | ईमिओ | वम | वम | वांति | वांति | वांति |
| व्हाँइस् | व्हाँक्स | ऑप्स | वाक् | वाच् | वाचा | वाचा | वाचा. |

सदरहू वरून, मूळ संस्कृतजननीपासूनच आर्य भाषेच्या अन्य शाखा उत्पन्न होऊन त्या विस्तृत झाल्या; आणि त्या जसजशा पूर्वपश्चिम दिशेनें फैलावत गेल्या, तसतसे त्यांच्यांत अनेक भेद होत जाऊन, मूळ शब्दांतही महदन्तर पडत चाललें.

संस्कृत मायभाषेच्या संबंधानें कित्येक पाश्चात्यांची समजूत.

असो. अशा प्रकारची वस्तुस्थिति असून, ती तशी आहे असें मानण्यासही अनेक बलवत्तर कारणें दृग्गोचर होतात. तथापि, संस्कृत भाषेला उचित असलेला हा मातृपदवीचा बहुमान तिला न देतां, कित्येक पाश्चात्य पंडित तिला स्थानभ्रष्ट करितात, व सहोदर पंक्तीलाच बसवितात. परंतु, हें त्यांचें करणें सयुक्तिक असल्याचें दिसत नाहीं. कारण, संस्कृत ही दुहिता किंवा शाखा ठरविली तर, ती ज्या भाषेपासून उत्पन्न झाली, अशी कोणती तरी तिच्याहून भिन्न अशी अन्य भाषा असली पाहिजे. परंतु तसें बिलकुल नसून, संस्कृत किंवा आर्यभाषा हीच जननी असल्यामुळें, तिच्याकडे मातृपदाचें श्रेष्ठत्व सहजीं येऊं पाहतें.

त्यांनीं घेतलेला आक्षेप व त्याचें निरसन.

आतां, कोणी कोणी असा आक्षेप घेतात कीं, हल्लींची संस्कृत भाषा जी अगदीं पूर्णतेच्या उच्च कोटीप्रत पोहोंचलेली

दिसते, ती प्रथमतःच तशी नसून, वेदकाळीं किंवा त्याच्या पूर्वीं जी संस्कृत भाषा प्रचारांत होती, तिज-वर नाना प्रकारचे अलंकार चढल्यामुळें, तिला हल्लींची स्थिति प्राप्त झाली आहे. आणि ती ज्या मूळ स्थितींत होती, तिच्यापासूनच संस्कृतची सांप्रतची परिणति झाली असल्यानें, तत्कालीन आर्यभाषेचीच संस्कृत ही दुहिता किंवा शाखा होय. परंतु, हें त्यांचें म्हणणें युक्तिवादास अनुसरून आहेसें वाटत नाहीं. कारण, कोणत्याही भाषेच्या मूळ स्थितींत सामान्य बदल झाला, अथवा ती कालान्तरानें परिपक्व दशेप्रत पोहोंचली, एव-ढ्याच सबबीनें ती त्या प्रथमावस्थेंतील भाषेची दुहिता किंवा शाखा आहे, असें म्हणणें निराधार असून, तसें प्रतिपादन करण्यास देखील प्रत्यवाय येईल.

तद्विषयक मासल्या-करितां उदाहरण.

उदाहरणार्थ, चॉसर कवीच्या वेळच्या आणि सांप्रतकाळच्या इंग्रजी भाषेंत जमीन आस्मानाचें अन्तर दिसून येतें. इतकेंच नव्हे तर, आंग्लभाषेची हल्लींची चारुता, तिचें सौंदर्य, तिच्यांतील विचारगांभीर्य, पदलालित्य, इत्यादि गुणांचा शतांश सुद्धां तिच्या त्या प्रथमास्थेंत, किंवा बाल्यदशेंत, आविर्भूत झालेला नव्हता. तथापि, एवढ्याच कारणांनीं, तत्कालीन आंग्लभाषेची हल्लींची इंग्रजीभाषा शाखा अथवा दुहिता आहे, असें म्हणणें कितपत अंशानें

असंबद्ध व वेडगळपणाचें होईल, तितक्याच अंशानें संस्कृत भाषेला वेदकालीन व आर्यभाषेची शाखा किंवा दुहिता ठरविणें होईल, अशी माझी अल्प समजूत आहे.

आर्यभाषा ह्मणजे संस्कृतच होय.

वास्तविक रीतीनें विचार केला तर, आपणांस असें दिसून येईल कीं, आर्यभाषा म्हणजे केवळ संस्कृतच होय. किंबहुना, आर्यभाषा आणि संस्कृत हे निव्वळ पर्याय शब्दच आहेत, असेंही ह्मणण्यास हरकत नाहीं. मात्र, भेद म्हणून इतकाच कीं, बाल्यावस्थेंत असलेली ती आर्यभाषा समजावयाची. पण तीच पुढें सुसंस्कृत होऊन जेव्हां परिपूर्ण दशेप्रत पोहोंचली, व अनेक संस्कार घडून तिच्यावर शब्दरत्नांचे जेव्हां नानाविध अलंकार चढले, तेव्हां तिला अर्थातच संस्कृत असें अन्वर्थ नामधेय पडलें.

ती मायभाषा मानण्यास कारणें.

संस्कृत भाषेपासून प्राकृत भाषा उद्भवल्या असल्याचें तर सर्वांसच कबूल असून, ही गोष्ट ज्याप्रमाणें सप्रमाण सिद्ध आहे, त्याचप्रमाणें संस्कृत भाषेपासूनच झन्द, ग्रीक, ल्याटिन्, इत्यादि भाषा देखील प्रसृत झाल्या असल्याबद्दल निःसंशय होत आहे. कारण, प्राकृत भाषांतील शब्दांचें मूळ जसें संस्कृत भाषेंतच उपलब्ध होतें, तसें झन्द, ग्रीक, ल्याटिन, वगैरे भाषांचें मूळही त्या गीर्वाण भाषेंतच सांपडतें. परंतु, संस्कृत भाषेच्या

संबंधानें तशी गोष्ट बिलकुल दिसून येत नाहीं. इतकेंच नव्हे तर, ह्या भाषेतील शब्दांचें मूळ रूप किंवा उगमस्थान, **संस्कृता**शिवाय अन्यत्र कोठें सुद्धां उपलब्ध होत नाहीं; अथवा, त्यांचीं मूळें देखील दुसरीकडे कोठेंही असल्याचें भासत नाहीं. सबब, **संस्कृत** हीच सदरहू शाखांची **मायभाषा** होय, असें वाटतें.

संस्कृत व तिच्यापासून उद्भवलेल्या शाखा, यांत महदन्तर पडण्याचें कारण.

आतां, कोणी कदाचित् अशी शंका घेईल कीं, जर **संस्कृत** पासून **ग्रीक**, **ल्याटिन्**, **इंग्रजी**, इत्यादि भाषा उद्भवल्याचें मानलें, तर **संस्कृतां**तील, आणि **ग्रीक**, **ल्याटिन्**, **इंग्रजी**, वगैरे भाषांतील शब्दांत पुष्कळ फरक दिसून येत असल्यामुळें, ह्या भाषांची **संस्कृत** ही **मायभाषा** असेलसें वाटत नाहीं. परंतु सदरीं निर्दिष्ट केलेल्या निरनिराळ्या भाषांत शब्दभिन्नता दृग्गोचर होते एवढ्याच कारणानें, त्या भाषा संस्कृतच्या शाखा नाहींत, असें म्हणतां येणार नाहीं. कारण, ज्याप्रमाणें **संस्कृत ग्रीक**, **ल्याटिन्**, **इंग्रजी** इत्यादि भाषांत महदन्तर आहे, त्याचप्रमाणें संस्कृत, व मराठी, बंगाली, हिन्दी, गुजराथी, वगैरे **प्राकृत** भाषांत देखील फारच भेद आहे. आणि असें असूनही, **संस्कृत** ही **प्राकृत** भाषांची **मायभाषा** असल्याबद्दल अखिल विद्वज्जन समूहाचें मतैक्यच आहे. शिवाय

वेदकालीन संस्कृतांत व तदनंतरच्या लौकिक[1] संस्कृतांत देखील पुष्कळ फरक दिसून येतो. परंतु, तेवढ्याच कारणानें, प्राकृत, पाली, झन्द, ग्रीक, ल्याटिन, इंग्रजी, इत्यादींची संस्कृत ही मायभाषा नव्हे, असें म्हणणें, किंवा वेदकालीन संस्कृत व तदनन्तरचें लौकिक संस्कृत ह्या भिन्नभिन्न भाषा होत असें प्रतिपादन करणें, केवळ भ्रांतिमूलक होईल, अशी माझी अल्प समजूत आहे.

मायभाषा ठरवितांना मुख्यत्वेंकरून विचार करण्याची गोष्ट.

मायभाषा कोणती आणि तिच्या शाखा कोणत्या, हें ठरविण्याच्या संबंधानें मुख्यत्वेंकरून विशेष मुद्याची गोष्ट पाहणें आहे ती ही कीं, समाजावस्थेंतील बाल्यदशेंत जे व्यावहारिक शब्द सर्वत्र प्रचारांत असण्याचा जास्त संभव आहे, ते शब्द ज्या भाषांत पर्यायानें अथवा अपभ्रष्टस्थितींत दृष्टीस पडतात, त्या भाषांस शाखा किंवा दुहिता समजून, अशा प्रकारच्या शब्दांचें मूळ, अगर खरें रूप, अथवा शुद्ध स्वरूप, ज्या भाषेंत दृग्गोचर होतें; इतकेंच नव्हे तर, तिच्या पलीकडे सदरहू शब्दांची मीमांसा करण्याला यत्किंचित देखील अवकाशच मिळत नाहीं; तिची गणना मायभाषेंत करणें अवश्य व यथान्याय आहे. आणि ह्याच मुद्यास

१ लौकिक संस्कृत म्हणजे उत्कृष्टावस्थेप्रत पावलेली संस्कृत भाषा होय. हिलाच इंग्रजींत Classical Sanskrit म्हणतात.

अनुसरून सारासार विचार केला तर, आमच्या **प्राकृत-भाषा**, व **पौरस्त्य** आणि **पाश्चात्य** इतर भाषा, ह्या केवळ शाखा किंवा दुहिता असून, **संस्कृत** हीच त्यांची **आदिजननी**, अथवा **मायभाषा**, किंवा त्यांचें **मूळ** असल्याचें निःसंशय ठरतें.

आमच्या ह्मणण्याच्या पुष्टीकरणार्थ, **आर्यसमाजाच्या** प्रथमावस्थेंत प्रचारांत असणाऱ्या व्यावहारिक शब्दांचें मूळरूप, व त्यांचा अपभ्रंश, इत्यादि दाखविणारें कोष्टक (मागील पान ५३ ते ५६ वर) आम्हीं पूर्वींच दिलें आहे. त्यावरून, आमच्या ह्मणण्याची सत्यता वाचकांच्या लक्षांत सहजीं येईल.

वेदकालीन संस्कृत आणि लौकिक संस्कृत यांतील अन्तर.

असो. **संस्कृत** आणि इतर **पौरस्त्य** व **पाश्चात्य** भाषांतील शब्दांत कसकसें स्थित्यन्तर आणि रूपान्तर होत गेलें, हें पूर्वीं (५३-५६ पृष्टांवर) मासल्याकरितां तपशिलवार दाखविलेंच आहे. सबब, आतां क्षणभर, **वेद**कालीं प्रचारांत असलेल्या **संस्कृत** भाषेकडे वळूं, आणि तींत व तदनन्तरच्या **लौकिक** भाषेंत, कितीसें अन्तर पडत गेलें तें पाहूं.

वेदकालीन संस्कृताचें स्थित्यन्तर.

आपण सूक्ष्म रीतीनें पाहिलें आणि शोधकबुद्धीनें अन्वेषण केलें तर, आपणास असें दिसून येईल कीं, **वैदिक** कालां-

तील कित्येक **संस्कृत** धातू फक्त त्यावेळीं मात्र प्रचारांत असून, ते पुढें पुढें अगदीं व्यवहारातीत झाले; व **लौकिक** संस्कृतांत तर त्यांचा मागमूसही राहिला नाहीं. अशा प्रकारचे धातू म्हटले म्हणजे कन्, इंख्, उण्ज, शव्, सच्, म्यच्, त्सर, ध्रज्, मन्द्, वेस्, वक्ष्, तुर्व, भर्व, वेण्, इत्यादि होत. ह्या खेरीज **तुवि**=विपुल, पुष्कळ; **नपात्**=संतान; **तक्मन्**= **मूलबाळ; ग्मा** (ज्मा)=पृथ्वी; **केतस्**=ज्ञान; **आकेनिप**= शहाणा, दूरदर्शी; वगैरे अनेक शब्द अशाच मासल्याचे आहेत.

याप्रमाणें, कित्येक मूळ धातू **लौकिक संस्कृतांत** अगदीं व्यवहारातीत होऊन गेले; आणि कांहींचें फक्त रूपान्तर मात्र झालें. ह्या प्रचारातीत शब्दांचें दिग्दर्शन वर केलें असून, **वैदिक** कालांतील **ग्रभ्** (=धरणें, पकडणें,) या धातूचें कांहींसें रूपान्तर होऊन, हाच शब्द पुढें **ग्रह** या रूपानें **लौकिक संस्कृतांत** प्रचारांत आला. आणि **ध्वृ**, **धुर्व**, व **शुन्ध्**, हे देखील अशाच प्रकारचे शब्द असून, त्यांचें कालान्तरानें परस्पर **व्हृ**, आणि **शुध्**, असें रूप बनलें गेलें.

सदरहू प्रमाणांवरून, संस्कृत भाषेचा निर्विवाद ठरत असलेला मातृपदाचा बहुमान.

अशा प्रकारें, **वेदकालीन संस्कृतांत** आणि तदनंतरच्या **लौकिक संस्कृतांत**, ह्या **भरतखंडांतल्या भरतखंडांत** देखील, जर कालान्तरानें येवढा फरक पडत गेला तर, दूर दूर

प्रदेशांत व निरनिराळ्या स्थितींत, भिन्नभिन्न परिवेष्टनांत व नानाविध अवस्थांत, ज्या **आर्यकुटुंबाच्या** शाखा पांगल्या, त्यांत हरएक बाबतींत, प्रचारांत, आणि विशेषतः भाषेंत, जमीन अस्मानाचें अन्तर पडत गेलें असावें, हें अगदीं साहजीक आहे. आणि ह्मणूनच **झन्द, ग्रीक, ल्याटिन,** इत्यादि भाषा जरी भिन्नभिन्नशा भासतात, तरी पण, त्यांतील **आदिशब्दांचें** मूळरूप केवळ **संस्कृतांतच** दृष्टिगोचर होत असल्या कारणानें, व तद्व्यतिरिक्त अन्यत्र तें कोठेंही उपलब्ध होत नसल्यामुळें, **संस्कृत** हीच अखिल **आर्यशाखांची मायभाषा** ठरते; आणि अतएव, मातृत्वाचें श्रेष्ठत्व व जननीत्वाचें अत्युच्चपद देखील तिच्याचकडे अनायासें आणि स्वयमेव चालून येतें.

तत्संबंधीं मूरचा आक्षेप व त्याचें निरसन.

आतां, **डाक्तर मूरनें** एके ठिकाणीं असा **आक्षेप** घेतला आहे कीं, **ग्रीक** आणि **ल्याटिन्** भाषांचें व्याकरण **संस्कृत** भाषेहून अगदीं भिन्न[१] असल्या कारणानें, सदरहू

---

१ "The whole grammatical character of Greek and Latin is that of independent languages."
( Muir's Sanskrit Texts. vol. II, P. 260. 2nd Edn. )

खरोखर विचार करतां, अशा प्रकारची वस्तुस्थिति नसून, **संस्कृत** भाषेच्या व्याकरणाची बहुतेक नक्कलच **ग्रीक व ल्याटिन** भाषांतील व्याकरणांत झालेली दिसते, असें पुढील विवेचनावरून वाचकांच्या लक्षांत येईल. (ग्रंथकर्ता.)

भाषा **संस्कृत** भाषेपासूनच उद्भवल्या आहेत, असें ह्मणतां येणार नाहीं. परंतु, सदरहू कोटिक्रम केवळ भ्रांतिमूलक असल्या कारणानें, तो किती अंशानें सिद्धवत् ठरतो, हें आपण विशेष तपासून पाहूं; आणि **संस्कृत** ही **झन्द**, **ग्रीक**, **ल्याटिन्**, इत्यादि सर्वांची **मायभाषा** आहे, किंवा **मूरच्या** मताप्रमाणें[1] त्यांची **भगिनी** आहे, याचा विचार करूं.

पौरस्त्य आणि पाश्चात्य भाषांतील संस्कृत शब्दांचें रूपान्तर, व त्यांचें विकृतिनियमसाम्य.

प्रथमतः, ज्या नियमांस अनुसरून, **संस्कृत** भाषेंतील शब्द, रूपान्तरानें किंवा विकृति होऊन, **प्राकृत** भाषांत प्रचारांत आले आहेत, त्याच नियमांचें अवलंबन करून, अथवा क्वचित् भिन्न

१ कारण, **मूरनें** एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, **संस्कृत** ही सदरहू भाषाचें मूळ नसून, ती त्यांची सोदरा होय.

" It is true that more may be said in favour of the hypothesis that the Zend has been derived from Sanskrit; but there are sufficient reasons for beleiving that Zend is a sister and not a danghter of sanskrit; and, consequently, that both have a Common Mother of a more primeval date.

" I therefore conelude, that Greek and Latin, as well as Zend, are not derived from Sanskrit. "

( Muir's Sanskrit Texts. vol. II. P. 266. )

परंतु, हें ह्मणणें भ्रांतिमूलक असल्याविषयीं, पुढील विवेचनावरून वाचकांच्या ध्यानांत येईल. ( ग्रंथकर्ता. )

त्यानें, संस्कृतशब्द हे झन्द, ग्रीक, आणि ल्याटिन् भाषांतही दाखल झाले आहेत. सबब, ह्या गोष्टीचें चांगलें स्पष्टीकरण होण्याकारितां, कित्येक उदाहरणें मी येथें केवळ मासल्यासाठीं देतों. त्यावरून एकंदर वस्तुस्थितीचें सहजीं दिग्दर्शन होईल.

| संस्कृत. | झन्द. | ग्रीक. | ल्याटिन. |
|---|---|---|---|
| पितृ | पतर. | पटीर | पेटर |
| मातृ | मातर | मीटीर | मेटर |
| भ्रातृ | भ्रातर | फ्रॅट्रीया | फ्रेटर |
| नप्तृ | नप | अनेप्सिऑस | नीपॉस |
| जामातृ | झामातर | गॅम्ब्रॉस | जेनीर |
| श्वश्रु | कशूर | हेकूरॉस | सोसर |
| पति | पैति | पोसिस | पोटिस, पोटन्स |
| हृदय | झरेधय | कर्डिया | कोर |
| अक्षिन् | अषि | ऑप्स, ओकॉस. ओखॉस. | ऑक्युलस् |
| दन्त | दन्तन् | ओडॉण्ट (द्वि). | डेंटेम् (द्वि) |
| अस्थिन् | अश्रि | ऑस्टियन | ऑस |
| पाद | पाध | पुस. पोडॅास (श). | पेस्. पेडिस.(श). |
| जानु | झ्नु | गोनु | जेनु |
| श्रोणि | श्रौणि | क्लॉनिस | क्लूनिस |

| | | | |
|---|---|---|---|
| पशु | पशु | पोऊ | पेकु |
| गौ | गाओ | वूस | वोस |
| स्थूर (बैल). | श्तौर. | टॉरॉस | टॉरस |
| नामन् | नामन् | ओनॉम | नॉमेन् |
| श्वान् | श्पा, शूनि | कुओन् | कनिस |
| अमृत | अम्हर्क | अंब्रोटॉस् | इम्मॉर्टयालिस् |
| शूकर | हू | सुस, हुस | सुस |
| वृक | वेहर्क | ल्यूकॉस | ल्युपस |
| वि. (पक्षी). | वि | ओइओनॉस | ॲव्हिस |
| अहि (सर्प). | अझि | एखिस | ॲंग्विस |
| मक्षिका | मक्षी | मुईआ | मस्का |
| देव | दएव | थिऑस | दिउस |
| उषस् | उष | इऑस, औओस | ऑरोरा |
| मास | माओम्ह | मीन, मीनी | मेन्सिस् |
| स्तर, तार | श्टेर | अस्टीर. ॲस्ट्रॉन् | ॲस्ट्रम् |
| अभ्र | अब्र | ऑम्ब्रास् ऑफ्रॉस. | इम्बर |
| हिम | झिम | खिऑन् खीमान् | हीम्स |
| रजत | ऋझत | अर्ग्युरॉस् | आर्जेण्टम् |
| धाम | देमान | डोमॉस | डोमस |
| स्वप्न | गफ्न | हुप्नॉस | सोपॉर, सोम्नस |
| बुध्न | बुन | पुथमिन् | फंडस |
| मर्त्य | मरेत | ब्रोटोस् | मॉर्टलिस् |

| | | | |
|---|---|---|---|
| चक्र | चख्र | कुक्लॉस | सर्कस |
| मनस् | मनंद | मीनॉस | मेन्स् |
| अंहस् | अङ्गंह | अँखो | अँगो. |
| सम | हम | होमॉस | सिमिलिस |
| दक्षिण | दषिण | डेक्सिऑस् | डेक्स्टर |
| नव | नव | निऑस | नॉव्हस |
| मध्य | मैध्य | मीसॉस | मीडिअस |
| परि.(सभोंवतीं) | पैरि | पेरि | पर |
| उपरि | उपैरि | हूपर | सुपर |
| प्र | फ्र | प्रो | प्रो |
| अन्तर | अन्तरे | एंटॉस | इंटर |
| नूनम् | नू | नून् | नन्क |
| अ, अन् | अ, अन् | अन् | इन् |
| कः | को | तिस् | क्विस् |
| किम् | कट् | ती | क्विड् |
| उभ | उब | ॲम्फो | ॲम्बो |
| क | क | कू | क्वो |
| कति | चैति | पोसोई. कोसोई | क्वॉन्टस् |
| कदा | कधा | कोटी | क्वॉन्डो |
| पश्चात् | पश्कात् | अपिस्थेन् | पोस्ट |
| च | च | कइ | क्वे |
| प्रथम | फ्रातीमो | प्रोटॉस् | प्रायमस् |

| | | | |
|---|---|---|---|
| द्वि | द्व | ड्युओ | ड्युओ |
| षट् | क्श्वस् | हेक्स | सेक्स |
| सप्तन् | हप्तन् | हेप्टा | सेप्टेम् |
| दशन् | दशन् | डेक | डीसेम् |
| विंशति | विशैति | इकोसी | विजिंति |
| शतम् | शतेम् | हेकटॉन् | सेंटम् |
| दर | दर | डेरो | ० |
| दा | दधामि | डिडोमि | डो |
| दान | दात | डोरॉन् | डोनम् |
| स्था | स्ता | हिस्तेमि | स्टो |
| स्तर (पसरणें). | स्तर | स्टॉर्न्युमि | स्टर्नो |
| भर | बर | फेरो | फेरो |
| भू | बू | फ्युओ | फुइ |
| तन् | थंज | टीनो | टेंडो |
| जन् | झन् | जेन्नो | जिन्नो |
| ज्ञा | झा | जिग्नॉस्को | नॉस्को |
| अद् | अद् | ईडो | इडो |
| वह् | वझ् | ओचिओमाइ | वेहो |
| वस् | वंह | हेन्युमि | व्हेस्विओ |
| सद् (बसणें). | हद् | हिझोमाई | सीडिओ |
| कृ | कर | क्रेनो | क्रियो |
| वम् | वम् | ईमिओ | व्हॉमो |

| | | | |
|---|---|---|---|
| विद् | विद | फीडो | व्हिडियो |
| त्रस् | तरेश् | ट्रीयो | टेरियो |
| पा | पा | पिनो | पोटेर |
| दिश् | दिश् | डिक्न्यूमि | डीको |

आतां, ह्यांच्या तुलनेनें आपण **भरतखंडांतील प्राकृत भाषा** पाहूं लागलों, तर आपल्याला त्यांच्यांतील **शब्दांचें रूपांतर** व अपभ्रंश फारच कमी प्रमाणानें आढळतात; आणि अतएव शब्दसाम्यही फार दिसून येतें.

संस्कृतापासून उद्भवलेल्या पौरस्त्य व पाश्चात्य भाषांतील शब्दविकृतीचें कमीज्यास्ती प्रमाण.

मासल्याकारितां, मुक्त, गुप्त, सूत्र, मार्ग, अर्थ, श्रेष्ठ, दृष्टि पुष्प, दक्षिण, मध्य, सत्य, तूष्णीम्, लघु साधु, सभा, वगैरे **संस्कृत शब्दांचें प्राकृतांत** खालीं लिहिल्याप्रमाणें रूपान्तर झालेलें दृष्टीस पडतें:—

मुत्त, गुत्त, सुत्त मग्ग, अत्थ, सेठ, दिठ्ठि, फुप्प, दक्खिण ( दाहिण ), मज्झ, सच्च, तुण्हीम्, लहु, साहु, सहा, इत्यादि.

त्याचें कारण.

सदरीं केलेल्या शब्दविकृतिविषयक मीमांसेवरून, वाचकांच्या लक्षांत इतकें तात्काळ येऊन चुकेल कीं, आमच्या **भारतीयशाखा भरतखंडांतून बाहेर** पडून जितक्या दूर दूर गेल्या, तितक्याच अंशानें मायभाषेंतील ( **संस्कृत** ) शब्दांत सहजींच

फरक पडत गेला. इतकेंच नव्हे तर, भरतखंड, इराण, ग्रीस, आणि इतली, यांतील महदन्तर अनेक शब्दांचें रूपान्तर होण्यास विशेष रीतीनें कारणीभूत झालें.

उदाहरणार्थ, ग्रीस व इतलीपेक्षां, इराण देश आमच्या सन्निध बराच असल्यामुळें, झन्द शब्दांत अपभ्रंशाचें प्रमाण अगदीं कमी आहे; आणि त्याच कारणानें, संस्कृत व झन्द भाषांतील शब्दसादृश्य कोणाच्याही लक्षांत तेव्हांच येतें. परंतु, आमच्याच शाखांपैकीं, मूळ ह्मणजे अर्थात् भरतखंड सोडून, ज्या ज्या दूरदूर गेल्या, आणि ग्रीस, इतली, इंग्लंद, इत्यादि देशांत जाऊन राहिल्या, त्यांत अपभ्रष्ट शब्दांचें मान जास्त वाढून, शब्दसाम्यांतही तितक्याच अंशानें विशेष फरक पडत गेला.

त्यासंबंधानें मूरची कबुली.

अशा प्रकारें, शब्दांच्या रूपान्तरांचें निकट साम्य पाश्चात्यांच्या अगदीं पदरांतच पडल्याकारणानें, त्याबद्दल डाक्तर मूरला देखील काडीमात्रही आक्षेप घेतां आला नाहीं. आणि म्हणूनच ती गोष्ट त्याला केवळ नाइलाजास्तव निर्विवाद कबूल करावी लागली. त्यामुळें, त्याला असें म्हणणें प्राप्त आलें कीं, कित्येक प्रसंगीं ग्रीक व ल्याटिन भाषांतील शब्दांचें रूपान्तर सुद्धां प्राकृत भाषांप्रमाणेंच झालेलें दृष्टीस पडतें.

" A few instances may, no doubt be discovered where the modes, in which the Latin or Greek forms vary from the Sanskrit, *correspond in some degree to those changes of softening* or *simplification*, which the Sanskrit forms have undergone in Prakrit.
(Muir's Sanskrit Texts. vol. II. P. 260/261.)

तथापि, आणखी जी एक गोष्ट आपण विशेष रीतीनें लक्ष्यांत ठेवणें अवश्य आहे, ती ही कीं, सर्व अपभ्रष्ट शब्दांत एकाच नियमानें विकृति होत नसून, त्यांचें रूपही एकाच प्रकारानें बदलत नाहीं. उदाहरणार्थ, **इतालियन् फ्रेंच,** आणि **स्पानिष** भाषा प्रत्यक्ष किंवा पर्यायानें **ल्याटिन**पासूनच झालया आहेत. तथापि **इतालियन्** भाषेंत **ल्याटिन्**चा ज्या तऱ्हेनें अपभ्रंश होत गेला आहे, त्याहून अगदीं भिन्न रीतीनें, **फ्रेंच** व **स्पानिश** भाषेंत तो झाला असल्याचें दिसतें. आणि ज्याप्रमाणें, **ग्रीक** व **ल्याटिन्** भाषांपासून **इतालियन्, स्पानिश, फ्रेंच,** इत्यादि भाषांचा उद्भव झाला, त्याचप्रमाणें, **संस्कृत मायभाषे**पासूनच **झन्द, ग्रीक, ल्याटिन,** वगैरे भाषा प्रसवल्याचें उघड होतें.

शब्दविकृतीच्या संबंधानें निरानिराळ्या भाषांतील नियमाभिन्नत्व.

**संस्कृतभाषा** म्हणजे अति प्राचीनकाळची आमची **आर्यभाषाच** होय. मात्र, भेद म्हणून इतकाच कीं, प्रथमावस्थेंत

आर्यभाषा किंवा संस्कृत यांचें तादात्म्य.

ही आर्यभाषा अगदीं साध्या स्थितींत असून, तिच्यावर कालान्तरानें, अनेक कविपुंगवांच्या अश्रान्त परिश्रमानें जसजसे अत्युत्कृष्ट अलंकार चढत गेले, तसतशी ती सुसंस्कृत बनून, परिपूर्णतेच्या अत्युच्च कोटीप्रत पोहोंचली.

तद्विषयक पाश्चात्य मत, व मूरचा अभिप्राय.

तथापि ती आर्यभाषेहून भिन्न नाहीं, याविषयीं तिळमात्र देखील शंका नाहीं. आणि हीच गोष्ट पाश्चात्यांस व खुद डाक्तर मूर ह्यांससुद्धां कबूल आहे. कारण, संस्कृत म्हणजे अति प्राचीन काळची आर्यभाषा समजावयाची, असें त्यानें एके ठिकाणीं म्हटलें आहे.[१]

पिक्टेट्चें मत.

ह्या सर्व भाषांचें मूळ एकच असल्याविषयीं, पिक्टेट्चें देखील म्हणणें आहे. एके ठिकाणीं तो असें लिहितो कीं,

" An indubitable result of the researches which have recently been pursued into the Arian tongues is, that, notwithstanding the various alterations which they have undergone, they all bear the clear impress of our common type, and are consequently decended from our real, living, primeval language,

---

१ " Sanskrit ( by which must be understood the then current form or forms of the Old Arian Speech ) a few ages previously. "

( Muir's Sanskrit Texts. vol: II. P. 145. )

which was complete in itself, and which was employed by a whole nation, as its common organ of communication." * * * P. 43.

( A Pictet. Origines Indo-Europennes. )

असो ह्यासंबंधानें पूर्वी यथावकाश विवेचन झालें आहे.

वेबरचें मत.

यासाठीं, एतद्विषयक पुनश्च ज्यास्त ऊहापोह न करतां, तत्संबंधीं एक अवश्य तें अवतरण वेबरच्या "भरतालेख्य" नामक ग्रंथांतून येथें देतों. तो म्हणतोः—

"A comparison of the grammatical structure of the Sanskrit, especially in its oldest form as represented in the Veda, with the Greek, Latin, German, Lettoslanonian, and Persian, &c., teaches us that *all these languages have a common basis*, or in other words that *they are derived from one common original speech*; and the gradation of sounds and forms points to the Sanskrit as the language, which in general still preserves the most original form, and has departed least from the original tongue. This existance of one common original language necessarily leads us to conclude, that at the period when it was still a living and spoken tongue, the people also which employed it formed one nation; and it results that the

individual nations, as well as their languages were formed by a gradual separation from the Indo-European people, and its language. And, moreover, the greater or less similarity of the several languages among each other, and particularly in reference to the Sanskrit, enables us to conclude whether the separation from the original stock took place in each case at an earlier or a later period."

( Weber, Indian Sketches. P. 7 ).

आर्यभाषा ही सर्वांचें मूळ असल्याविषयीं पाश्चात्यांची संमति.

ह्यावरून, **संस्कृत, झन्द, ग्रीक, ल्याटिन, जर्मन्,** इत्यादि भाषा कोणत्या तरी एका मूळ **आर्यभाषे**पासूनच उत्पन्न झाल्या असून, तीच **मूळभाषा** एकंदर सर्व भाषांची **जननी** अथवा **मायभाषा** होय, असें सर्व पाश्चात्य पंडितांचें ठाम मत असल्याविषयीं वाचकांच्या सहजीं लक्षांत येईल.

पाश्चात्य मतानेंही आमच्या प्रतिपादनाचें पुष्टीकरण.

आतां, ही मूळ **आर्यभाषा** कोणती होती, अथवा ती कोणती समजावयाची, याबद्दलचा आपण विशेष शोध करूं, आणि ती तशी असल्याविषयीं केवळ नावाजलेल्या **पाश्चात्य** पंडितांचेंच काय म्हणणें आहे, हें पाहूं. कारण, तसें केल्यानें, एकंदर वस्तुस्थिति वाचकांच्या लक्षांत येईल. इतकेंच नव्हे तर, आम्हीं ज्या

विषयाचें प्रतिपादन करितों आहों, त्याचें मण्डण पाश्चात्यांनीं दाखविलेल्या प्रमाणांनींच होऊन, त्यांचेंच माप त्यांच्या पदरांत पडेल; आणि सोनारानेंच कान टोंचल्यामुळें, कोणाचीही तक्रार राहणार नाहीं.

आमच्या ह्मणण्याच्या समर्थनार्थ पाश्चात्यमताचें साहाय्य घेण्याचें कारण.

कारण, सांप्रतकाळीं, आमच्या ह्या परमपूज्य आर्यभूमीला सर्वप्रकारें संपूर्ण ओहोटी लागल्यामुळें, आमचें सर्व कांहीं खरें असूनही, तें प्रत्यक्ष आह्मांला देखील तसें असल्याचें दिसत नाहीं. मग, परकीयांस तें सर्वतोपरि अनृत वाटावें, यांत तर कांहींच नवल नाहीं. शिवाय, प्रतिकूल काळ, दैवदुर्विपाक, मंदभाग्य, कालगतिवैचित्र्य, पारतंत्र्य, व परावलंबन, इत्यादि योगानें, आमची प्रस्तुतची स्थिति अशी कांहीं चमत्कारिक होऊन गेली आहे कीं, अनुभवास येणाऱ्या खऱ्या खऱ्या गोष्टी जरी आम्ही आपल्या देशबांधवांपुढें आणि परद्वीपस्थासमोर मांडल्या, तरी आमच्या दुर्दैवामुळें, तद्विषयक सत्यासत्यतेचा विचार करण्याविषयीं, ते केवळ पराङ्मुखच असतात. इतकेंच नव्हे तर, त्यासंबंधानें ते प्रथमतः तर अगदींच दुर्लक्ष्य करून, कालान्तरानें जेव्हां त्यांचीच चूक त्यांस भासमान होते, तेव्हां मात्र झालेल्या चुकीचा प्रतिकार करण्याबद्दल, ते क्वचित प्रयत्न करितात, व झटतात.

दैवदुर्विपाक व कालगतिवैचित्र्य.

दुसरें कारण असें कीं, आज काल पाश्चात्य देशाची सर्व तऱ्हेनें चलती आणि बोलबाला असून, तिकडे पूर्ण चन्द्रोदय झाल्यानें, त्या देशांत चोहोंकडे आपोआपच भरती आली आहे. तेव्हां, त्यांचें बोलणें व लिहिणें ह्मणजे अर्थात्च "**बाबा वाक्यं प्रमाणम्**" अतएव, तद्देशियांनीं लिहून ठेविलेल्या गोष्टींवर त्यांचा जास्त विश्वास बसून, ते त्या मानतात व कबूल करतात, हें अगदीं साहजीक आहे. आणि ह्मणूनच, आमच्या प्रतिपादनाच्या पुष्टीकरणार्थ, कधींकधीं परद्वीपस्थांचे अभिप्राय घेण्याची मोठी आवश्यकता पडते; व वारा वाहील तशी पाठही द्यावी लागते.

वेदकालीन आर्यभाषा, व संस्कृत ही तिची परिणाति.

असो. जी संस्कृत भाषा झन्द, ग्रीक, ल्याटिन्, इत्यादींची भगिनी आहे असें कांहीं पाश्चात्य म्हणतात; अथवा जी भाषा इतर भाषांची जननी नव्हे, असें कित्येक प्रतिपादन करतात; त्यांना येवढें कबूल करणें अगदीं भाग पडतें कीं, आमचे प्राचीनतम ऋषी वैदिककालांत जी भाषा बोलत असत, ती त्यांची व्यावहारिक भाषा होती. इतकेंच नाहीं तर, तिच्या खेरीज दुसरी कोणतीही भाषा त्यावेळीं प्रचारांत नसून, ती तशी असणें देखील शक्य नव्हतें. त्यामुळें, एकंदर व्यवहारांत, त्या पुरातनकाळीं, फक्त वैदिक भाषे-

चाच उपयोग आमचे आर्य ऋषी करीत असत. आणि त्याच वैदिक भाषेची **संस्कृत** भाषा ही अपूर्व परिणति होय.

ह्यासंबंधानें, वाचकांची खात्री होऊन त्यांचें कुतूहल

तद्विषयक मूरचें मत. पुरविण्यासाठीं, ज्या त्या ग्रंथांतील मूळ उतारेच येथें मासल्याकरतां सादर करतों.

**डाक्तर मूर** म्हणतो :—

" Finally, I revert to the conclusion before indicated, that the *language in which the Vedic hymns were composed can have been no other than the vernacular speech which was employed by* the Rishis and their Contemporaries, as it is quite inconceivable that in that early age when the refinements of grammar were unknown, there could have existed any learned language distinct from the ordinary dialect of the people. "

( Muir's Sanskrit Texts, vol. II, Preface to the First Edition. P. XIV. 2nd Edn. ).

( सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ग्रंथकर्ता. )

ह्याच संबंधाचें विवेचन करून, **संस्कृत** ही व्यावहारिक भाषा असल्याविषयींचें लिहितांना, तो आणखी असें देखील म्हणतो कीं,

" Sanskrit ( by which must be understood the then current form or forms of the Old Arian speech ) a few ages previously ; for

in fact, no other Arian language then existed in India which they could have used."
( Muir's Sanskrit Texts. vol. II. P. 145 ).

बीमचा अभिप्राय.

फार तर काय सांगावें पण, शब्दांचीं अतिप्राचीन किंबहुना पुराणतमरूपें, संस्कृत भाषेशिवाय अन्यत्र कोठें देखील मिळू शकत नाहींत. अथवा उपलब्ध होत नाहींत, व तीं सांपडण्यास मार्गही नाहीं, असें मिस्तर बीमला सुद्धां निष्प्रांजलपणें कबूल करावें लागलें. त्यामुळें, तोही असें लिहितो कीं,

"It is a highly probable theory that the 'Old Aryan' like all other languages, began to be modified in the mouths of the people as early as the Vedic period, and that the Brahmins, at a subsequent date, *in order to prevent the further degeneration of their language*, *polished*, *elaborated*, and *stiffened it into the classecal* Sanskrit. We cannot, however, suppose that they brought *any new material into the language*, but simply that *they reduced to rule what was till then vague* and *irregular*, that they extended to the whole of the language enphonic laws which had been tlll then only of partial application, and so forth; all the while, however, *only working upon already existing materials.* It will, therefore, not

militate against the established contemporaneous existence of learned Sanskrit and popular Prakrit, to consider *the former* as in general *the representative* of the *original* Old Aryan, and consequently, as so far older than the Prakrit; because, ex hypothesis, in Sauskrit *most of what existed in Old* Aryan *has not only been preserved but worked up and expanded. while in the* Prakrit, on the contrary, not only has much been *absolutely lost, but that which remains has* been corrupted and debased. Besides, as nothing whatever of the Old Aryan has been preserved, or is likely to be discovered although much may be, and has been, guessed at from analogy ), *we are driven, whether we like it or no, to look to* Sanskrit *for the oldest extant forms; and we do, undoubtedly, find them there, as contrasted with* Prakrit and Pàli."

( Journal R. A. Society. 1870. vol. V. New series. P. 149. Relation of the Prakrits to the Old Aryan. )

( सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ग्रंथकर्ता. )

वेबरचा लेख.

तसेंच, पाली भाषेच्या संबंधानें डी. आल्वीसच्या लेखाचें निरीक्षण करतांना, सुप्रसिद्ध गुणदोषविवेचक जो प्रोफेसर वेबर, त्यानें देखील, संस्कृत ही वैदिक भाषेपासून

उत्पन्न झाल्याबद्दल, अथवा वैदिक भाषेची संस्कृत ही केवळ परिणतीच असल्याविषयीं, अगदीं स्पष्ट लिहिलें आहे. तो असें म्हणतो कीं,

" The long investigation which the author then institutes ( P. P. lXXIII—cXXII ) regarding the antiquity of the Páli and its relation to the Sanskrit conducts him rightly to the conclusion that both dialicts were ' Contemporareously ' *evolved from one source* ( viz, the *Vedic language* ). "

( सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ग्रंथकर्ता. )

त्यावरून, वेदकालीन आर्यभाषा ही सर्वांची जननी असल्याविषयीं होत असलेला सिद्धांत.

ह्यावरून, वेदकालीन आर्यभाषा सर्वांची जननी असल्याविषयीं, पाश्चात्यांची देखील सम्मति असल्याचें उघड होतें. म्हणजे, ज्या भाषेंत आमचे प्राक्कालीन ऋषिवर्य, त्यांचें विस्तृत कुटुंब, आणि त्यांचीं मुलेंबाळें बोलत असत; किंबहुना, ज्या भाषेंतच आमच्या पुराणतम ऋषींनीं ऋग्वेद गाइला; तीच सर्वांची मायभाषा होय, अशाबद्दल पाश्चात्य पंडितांचा पूर्ण अभिप्राय असल्याचें चांगलें व्यक्त होतें. इतकेंच नव्हे तर, आर्य आणि वैदिक भाषा हे केवळ पर्याय शब्द होत, आणि ते तुल्य शब्द समजूनच त्यांचा पाश्चात्यांनीं उपयोग केला आहे, असें वाचकांच्या लक्षांत सहजीं येईल.

आतां, **वैदिक** भाषा आणि **संस्कृत**, यांत कोणता फरक व भेद आहे; किंवा, ते निव्वळ पर्याय शब्द असून, त्यांत कांहींच विशेष नाहीं, याबद्दलचें थोडेसें दिग्दर्शन येथेंच केलें पाहिजे. कारण, तसें केल्यानें, पुढील विवेचनास मदत मिळून, एकंदर विषयाचें प्रतिपादनही यथानुक्रम होईल.

वेदकालीन आर्यभाषा म्हणजे संस्कृतच होय.

**वेदकालांत** प्रचारांत असलेली ती **वैदिक** भाषा होय. आणि तीच भाषा अलंकृत होऊन जेव्हां परिपूर्णतेस आली, तेव्हां तिला **संस्कृत** असें अन्वर्थ नांव पडलें. अर्थात्, ह्या दोहोंमध्यें भेद म्हणून इतकाच कीं, पहिली बाल्यावस्थेंतील असल्यामुळें अगदीं साधी दिसते; आणि दुसरी अलंकृत झाल्याकारणानें विशेष रूपवती भासते. परंतु तत्वदृष्ट्या, त्यांचें निःसंशय तादात्म्यच आहे; आणि अतएव, **संस्कृत** ही **वैदिक** भाषेची दुहिता नसून ती सर्वांची **मायभाषा** अथवा **जननी** आहे, असें म्हणण्यास काडीमात्रही हरकत व बाध नाहीं.

आर्यभाषा व संस्कृत हे पर्याय शब्द असून, ते स्थितीचे वाचक होत.

याप्रमाणें, **वैदिक** भाषा आणि **संस्कृत** ह्या केवळ एकच असून, त्यांत कालगतीनें जें स्थित्यन्तर व क्वचित् रूपान्तर झालेलें दृष्टीस पडतें, तेवढ्याच सबबीनें पहिली दुसरीची **जननी** असल्याचें खचितच म्हणतां येणार नाहीं.

कारण, पहिलीनें दुसरीला जन्म दिला, किंवा दुसरी पहिली पासून उद्भवली, असें आपणांला निःसंशय ह्मणता येणार नाहीं. आणि म्हणूनच, त्या दोहोंमध्यें मातासुतांचें यत्किंचित् देखील नातें नाहीं.

त्याचें उदाहरण.

उदाहरणार्थ, जी कुमारिका बाल्यावस्थेंत केवळ साध्या आणि वसनहीन स्थितींत आपल्याला दृष्टीस पडते, तीच कालान्तरानें तारुण्याप्रत पावून अनेक सुरम्य विभूषणांना अलंकृत झाली, तर ह्या अति रमणीय युवतीला त्या मुग्ध कुमारिकेची सुता ह्मणणें, किंवा त्या कुमारिकेला ह्या युवतीची माता ठरविणें, प्रशस्त होईल काय ? खचितच नाहीं. आणि एतद्विषयक मतभेद होण्याचा देखील बिलकुल संभव नाहीं.

महाराष्ट्र प्राचीन व अर्वाचीन भाषा.

ह्याच्याच मुकाबिल्यास आपण दुसरा एक दाखला घेऊं, म्हणजे वाचकांच्या लक्षांत एकंदर वस्तुस्थिति येईल. मुकुंदराज-कवीच्या वेळचीं मराठी भाषा, अथवा त्यानंतरची ज्ञानदेव कालीन मराठी भाषा, आणि सांप्रतकाळची महाराष्ट्र भाषा, यांत जमीनअस्मानाचें अन्तर आहे. पहिली नीरस व बाल्यदशेंत असून, हल्लींच्या मराठी भाषेंत प्रागल्भ्य, अर्थगौरव, पदलालित्य, व्यंजकत्व, इत्यादि अनेक गुण दृष्टीस पडतात. तथापि, केवळ पहिली मुग्धा-

वस्थेत व दुसरी तारुण्यदशेंत सालंकृत दृग्गोचर होते येवढ्याच कारणानें, पहिलीला दुसरीची **जननी** किंवा **मायभाषा** म्हणणें अगदीं भ्रांतिमूलक आणि चुकीचें होय, असें कोणासही कबूल करावें लागेल.

हाच नियम अन्य भाषेलाही तितक्याच प्रमाणानें सर्वांशीं लागू पडतो. **चॉसरची**[1] कविता व त्याच्या वेळची आणि तत्पूर्वकालीन **आंग्ल** भाषा, तसेंच **मिल्टन्**चें काव्य व सांप्रतकाळची **इंग्रजी** भाषा, यांत निःसंशय महदन्तर आहे. तथापि, एक दुसरीची **जननी** नाहीं, किंवा दुसरी पहिलीची दुहिता नाहीं, ही गोष्ट कोणालाही कबूल करणें भाग आहे.

प्राक्कालीन व आधुनिक आंग्ल भाषा.

असो. तात्पर्य म्हणून इतकेंच कीं, **वैदिक** भाषा आणि **संस्कृत** एकच असून, ते केवळ पर्याय शब्द होत. आणि ज्यापेक्षां **वैदिक** ही इतर भाषांची ( म्हणजे **झन्द, ग्रीक, ल्याटिन् जर्मन्**, इत्यादींची ) **जननी** अथवा **मायभाषा** असल्याचें **पाश्चात्य** विद्वानांसही कबूल आहे, (मागें पान ७३ ते ८१ पहा ), त्यापेक्षां, संस्कृत ही **वैदिक** भाषेचीच परिणती असल्यामुळें, अर्थात् तीच सदरीं नमुद केलेल्या

सर्वांचा तात्पर्यार्थ, व संस्कृत भाषेचें जननित्व.

[1] हा **आंग्ल** कवि इ० स० च्या चौदाव्या शतकांत उदयास आला होता.

सर्व भाषांची **जननी** किंवा **मायभाषा** असल्याविषयीं सप्रमाण शाबीत ठरतें; व तिच्याच **महाराष्ट्रादि प्राकृत** भाषा ह्या पौरस्त्य शाखा, आणि झन्द, **ग्रीक**, **ल्याटिन**, वगैरे भाषा पाश्चात्य शाखा असल्याचें सिद्ध होतें.

व्याकरण साम्याबद्दल विचार.

याप्रमाणें, शब्दविकृति व **संस्कृत** भाषेचें जननीत्व, यांसंबंधानें यथावकाश अवश्य तें विवेचन झालें. सबब, आतां, सदरहू भाषांच्या व्याकरणाकडे आपण क्षणभर वळूं, आणि **संस्कृत**, **झन्द**, **ग्रीक**, व **ल्याटिन**, यांच्या व्याकरणपद्धतींत कितीसें साम्य आहे, याबद्दलचा विचार करूं. म्हणजे त्यावरूनही ह्या सर्व भाषा **संस्कृतोद्भवच** आहेत, असें वाचकांच्या लक्षांत सहजीं येईल.

ह्या विचार करण्याचें कारण.

आतां, शब्दसादृश्यानन्तर व्याकरणसाम्याविषयीं विचार करण्याचें विशेष प्रयोजन हें कीं, **संस्कृत** ही सर्वांची **जननी** अथवा **मायभाषा** असून, **झन्द**, **ग्रीक**, **ल्याटिन**, इत्यादि **तिच्याच** शाखा असल्याचें उघड होतें; आणि तें सदरीं नमुद केलेल्या प्रमाणांवरून सिद्धही ठरतें. असें असून, **ग्रीक** व **ल्याटिन**, भाषांच्या व्याकरणावरून, ह्या भाषा स्वतंत्र असल्याचें दिसतें, असें **मूरनें** एके

१ " It cannot be admitted, however, as I have already remarked, that Greek and Latin are deriva-

( पुढें चालू )

ठिकाणीं म्हटलें आहे. सबब, हें त्याचें म्हणणें किती अंशानें खरें आहे, हें अवश्य पाहिलें पाहिजे. कारण,

मूरचें मत, व त्याचें निरसन.

मूरचें प्रतिपादन वस्तुस्थितीस अनुसरून असल्याचें दिसत नाहीं; आणि म्हणूनच तें भ्रांतिमूलकसें भासतें. सबब, सूर्य व जयद्रथ यथाशक्ति दाखवून, सदरहू भ्रामक कल्पनेचें निरसन व्हावें, एतदर्थच हें सांप्रतचें विवेचन आम्ही आपल्या अल्प समजुतीप्रमाणें करण्याचें योजिलें आहे.

ह्या बाबतींत, विशेष शोधाअंतीं, असें दिसून येतें कीं,

संस्कृतांतील व्याकरण-विचाराचें इतर भाषांत प्रतिबिंब.

संस्कृतांतील व्याकरणसंबंधीं सर्व स्थूल विचाराचें प्रतिबिंब झन्द, ग्रीक, ल्याटिन, इत्यादि भाषांत क्वचित् हुबेहुब, व क्वचित पर्यायानें, परंतु स्पष्टपणें, दिसून येतें. आणि लिंग, वचन, विभक्ति, काळ, प्रत्यय, अभ्यास[१],

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

tives from Sanskrit. There is no proof of this theory, and all probability is against it. The whole grammatical character of Greek and Latin is that of independent languages."

( Muir's S. Texts. vol. II. P. 260 ).

आपल्या प्रतिपादनाच्या पुष्टीकरणार्थ, मूरनें एक देखील बळकत्तर प्रमाण दाखविलें असल्याचें दिसत नाहीं. ( ग्रंथकर्ता. )

१ व्याकरणांत अक्षराच्या द्विरुक्तीस अभ्यास म्हणतात. उदाहरणार्थ, पपच, पफल, ददौ, इत्यादि.

इत्यादींचें अत्यन्त सादृश्य **संस्कृता**प्रमाणेंच ह्या भाषांतही आढळतें.

लिंगविचार.

वाचकांस माहीतच आहे कीं, **संस्कृतां**त तीन **लिंगें** आहेत. पुल्लिंग; स्त्रीलिंग; व नपूंसकलिंग. **झन्द, ग्रीक, ल्याटिन,** इत्यादि भाषांत देखील सदरहू तीन्हीं लिंगें आहेत.

वचनविचार.

तसेंच, **संस्कृतां**त तीन **वचनें** आहेत. म्हणजे एकवचन, द्विवचन, आणि अनेक वचन. हीं तिन्हीं वचनें **झन्द** व **ग्रीक** भाषेंत देखील आहेत, असें पुढील विवेचनावरून वांचकांच्या सहजीं ध्यानांत येईल.

**ल्याटिन्** भाषेंत मात्र द्विवचन नसून, तींत फक्त एकवचन आणि अनेकवचनच दृष्टीस पडतें. ह्याचें कारण असें दिसतें कीं, **संस्कृत** भाषेचें रूपान्तर होत होत, अति दीर्घ देशान्तरामुळें, शेवटीं द्विवचनालाही कालान्तरानें खो लागून, त्याचा स्वयमेव लोप झाला असावा.

विभक्ति विचार.

शिवाय, **संस्कृतां**त **प्रथमा, द्वितीया, तृतिया, चतुर्थी, पंचमी, शष्ठी, सप्तमी,** आणि **संबोधन,** अशा आठ **विभक्ती** आहेत. ह्या आठही विभक्ती **झन्द, ग्रीक, ल्याटिन,** वगैरे भाषांत आढळून येतात.

त्याचप्रमाणें, **संस्कृतांत भूत, वर्तमान,** व **भविष्य**

काळविवेचन

असे तीन काळ असून, ते झन्द, ग्रीक, ल्याटिन्, इत्यादि भाषांत देखील आहेत.

प्रत्यय विचार.

ह्याखेरीज, संस्कृतांत जे नामाचे आणि क्रियापदाचे प्रत्यय आहेत, तेच झन्द, ग्रीक, ल्याटिन्, वगैरे भाषांतही कचित् प्रत्यक्ष, व कचित् थोड्याबहुत फरकानें, आपल्या दृष्टीस पडतात.

अभ्याससाम्य.

इतकेंच नव्हे तर, भूतकाळांत (म्हणजे लिटांत आणि लुङांत) क्रियापदाचे प्रत्यय लावण्यापूर्वी जो अभ्यास होतो, तोच ग्रीक व ल्याटिन भाषांत देखील होत असल्याचें पुढील उदाहरणावरून वाचकांच्या सहजीं लक्षांत येईल.

लिंगसाम्याचें उदाहरण.

संस्कृताप्रमाणेंच झन्द, ग्रीक, ल्याटिन भाषांत देखील पुल्लिंग, स्त्रीलिंग नपुंसकलिंग असल्याचें उदाहरणः—

पुल्लिंग.

| संस्कृत. | झन्द. | ग्रीक. | ल्याटिन्. |
|---|---|---|---|
| वृकः | विन्हको. | ल्यूकॉस. | ल्यूपस्. |

स्त्रीलिंग.

| | | | |
|---|---|---|---|
| जिव्हा. | हिझ्व. | ग्लोस्स. | लिंग्वा. |

नपुंसकलिंग.

| | | | |
|---|---|---|---|
| नाम. | नाम. | ओनोम. | नॉमेन्. |

वचनसाम्याचा मासला.

संस्कृताप्रमाणेंच झन्द आणि ग्रीक भाषांत एक-वचन, द्विवचन, व अनेकवचन असल्याबद्दलचा दाखलाः—

**एकवचन.**

| संस्कृत. | झन्द. | ग्रीक. | ल्याटिन. |
|---|---|---|---|
| वृकः | विऱ्हको. | ल्यूकॉस. | ल्यूपस्. |

**द्विवचन.**

| | | | |
|---|---|---|---|
| वृकौ. | विऱ्हक. | ल्यूको. | (द्विवचन[१] नाहीं.) |

**अनेकवनच.**

| | | | |
|---|---|---|---|
| वृकाः | विऱ्हकौन्हो. | ल्युकोइ. | ल्यूपी. |

विभक्ति साम्याचें उदाहरण.

संस्कृताप्रमाणेंच झन्द, ग्रीक, व ल्याटिन् भाषांत संबोधनासहित आठही विभक्ति असल्याचा मासलाः—

| विभक्ति. | संस्कृत. | झन्द. | ग्रीक. | ल्याटिन्. |
|---|---|---|---|---|
| प्र० | वृकः (सू.) | विऱ्हको. | ल्यूकॉस. | ल्यूपस्. |
| द्वि० | वृकम्. | विऱ्हकेम्. | ल्यूकॉन्. | ल्यूपम्. |
| तृ० | वृकेण. | विऱ्हक. विऱ्हका. | ल्यूको. | ल्यूपो. |
| च० | वृकाय | विऱ्हकाइ. | ल्यूको. | ल्यूपो. |
| पं० | वृकात्. | विऱ्हकात्. | ल्यूको. | ल्यूपो. |
| श० | वृकस्य. | विऱ्हकही. | ल्यकौ. | ल्यूपि. |

१ संस्कृतोद्भव ल्याटिन व इतर भाषांत द्विवचन नाहींसें होण्याचें कारण पूर्वी सांगितलेंच आहे. ( मागें पान ८७ पहा. )

| | | | | |
|---|---|---|---|---|
| स० | वृके. | वि्हकी. | ल्यूको. | ल्यूपो. |
| सं० | वृक. | वि्हक. | ल्यूकी. | ल्यूपी. |

संस्कृताप्रमाणें, झन्द, ग्रीक, व ल्याटिन्भाषांत-

कालसाम्याचें उदाहरण.

हीं वर्तमान, भूत, आणि भविष्य-काळ असल्याचें उदाहरणः—

**वर्तमानकाळ.**

| प्रथमपुरुष. | संस्कृत. | झन्द. | ग्रीक. | ल्याटिन. |
|---|---|---|---|---|
| ,, | ददामि. | ददाह्मी. | डिडोमि. | डो. |
| | | **अपूर्णभूतकाळ.** | | |
| ,, | अददाम्. | ० | एडिडॉन्. | डबम्. |
| | | **पूर्णभूतकाळ.** | | |
| ,, | ददौ. | ० | डेडोके. | डेडि[1]. |
| | | **भविष्यकाळ.** | | |
| ,, | दास्यामि | ० | डोसो. | ० |

प्रत्ययसाम्याचा मासला.

आतां, क्रियापदाचीं अथवा नामाचीं रूपें होतांना, संस्कृतांत जे कित्येक प्रत्यय लागतात, तेच प्रत्यक्ष किंवा पर्यायानें, झन्द, ग्रीक, व ल्याटिन भाषांतही लागत असल्याचें पूर्वीं सांगितलेंच आहे. सबब, त्याचें उदाहरण येथें देतों.

१ पूर्णभूतकाळांतील तिन्ही भाषांतील हा झालेला अभ्यास ध्यानांत ठेवण्यासारखा आहे.

एकवचनाचे क्रियापदाचे प्रत्यय.

| संस्कृत. | झन्द. | ग्रीक. | ल्याटिन. |
|---|---|---|---|
| मि. | मि. | मि. | म् |
| सि. | हि. | सि. | स्. |
| ति. | ति. | ति. | त्. |

अस् धातूचें एकवचनी रूप.

| | | | |
|---|---|---|---|
| अस्मि. | अह्मि. | ईमि. एम्मि. | सम्. |
| असि. | अहि. | ईस्. एस्सि. | एस्. |
| अस्ति. | अश्ति. | एस्टि. | एस्ट. |

द्विवचन आणि अनेक वचनाच्या प्रत्ययांत बराच भेद असून झन्द भाषेंत "स" काराच्या ऐवजीं "ह" काराचा आदेश झाल्याचें दिसतें.

नामाच्या प्रत्ययांतही अशाच प्रकारचें थोडेंबहुत साम्य असल्याचें, मागील विवेचनावरून वाचकांच्या ध्यानांत येईल.

अभ्याससाम्याचें उदाहरण.

असो. संस्कृताप्रमाणेंच ग्रीक आणि ल्याटिन् भाषांत देखील पूर्णभूतकाळांत (लिटांत) अभ्यास होत असून, वर्तमानकाळांत व संकेतार्थी क्रियापदांत, फक्त ग्रीक भाषेंतच तो करण्यांत येतो.

पूर्णभूतकाळ. ( एकवचन. )

| संस्कृत. | ग्रीक. | ल्याटिन. |
|---|---|---|
| प्र. पु. ददौ. | डेडोक. | डेडि. |

| | | |
|---|---|---|
| द्वि. पु. ददिथ. | डेडोकस्. | डेडिस्टि. |
| तृ. पु. ददौ. | डेडोके. | डेडिट. |

## वर्तमानकाळ.

| | संस्कृत. | ग्रीक. |
|---|---|---|
| ए० व० | दधामि. | टिथेमि. |
| | दधासि. | टिथेस्. |
| | दधाति. | टिथेसि. |

## संकेतार्थी ( लङ. )

| | | |
|---|---|---|
| ए० व० | दद्याम्. | डिडोईन्. |
| | दद्यास. | डिडोईस्. |
| | दद्यात्. | डिडोई. |

अन्यसाम्याचा मासला व तद्विषयक मूरची कबुली.

ह्याशिवाय, आणखीही कित्येक नांमें, सर्वनामें, विशेषणें, क्रियापदें, कृदन्तें, उपसर्ग, आणि निपात, इत्यादि नानाविध

| | मराठी. | संस्कृत. | झन्द्. | ग्रीक. | ल्याटिन. |
|---|---|---|---|---|---|
| १ | बाप | पितृ | पटर | पटीर | पेटर. |
| २ | कोण | कः (स्). | को | टिस् | किस् |
| ३ | वृद्ध | सन | हन | हीनॉस् | सेनेक्स |
| | जड | गुरु | ० | बॅरस् | ग्रॅव्हिस् |
| ४ | बसतो | तिष्ठामि | हिस्तामि | हिस्टेमि | स्टो |
| ५ | हवन केलेलें | हुत | ० | ह्यूटॉस | ० |
| ६ | वर | उपरि. | उपैरि. | हूपर. | सूपर. |
| | | प्र | फ्र | प्रो | प्रो |
| ७ | नकारार्थी | अ. अन् | अ. अन् | अ. अन् | इन् |
| | ० | न | न | न | नी. नॉन् |

व्याकरण प्रकारांत, केवळ **संस्कृतांतलेंच** प्रतिबिंब तदितर भाषांत, ( म्हणजे झन्द, ग्रीक, ल्याटिन्, वगैरे भाषांत, ) क्वचित् प्रत्यक्ष व क्वचित् पर्यायानें दिसून येत असल्याचें चांगलें व्यक्त होतें; आणि म्हणनच ती गोष्ट **डाक्तर मूर**[१]लाही कबूल करणें भाग पडतें.

---

१ " In the some way, if we compare Sanskrit with the language of the ancient Greeks ( who lived to the north-west of Persia, on the eastern and western shores of the Ægean sea ), and with that of the Romans, who inhabited Italy, we shall find *a close resemblance, frequently an almost perfeet identity in very many words, both as regards the roots and the inflection.* "

( Muir's Sanskrft Texts. vol. II. P. 226 ).

सदरहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत.

याप्रमाणें, गण, व विभक्ति, यांच्यासंबंधानें **संस्कृताशीं ग्रीक** आणि **ल्याटिन्**चें निकट साम्य असल्याचें सांगून, **डाक्तर मूर** आणखी असेंही लिहितो कीं,

" There thus exists a *double resemblance,* viz. first of *roots,* and second of *inflections*, between the Latin and the Sanskrit, and the same remark is equally true of the Greek and the Zend." P. 227.

" The *forms of Conjugating verbs* in Sanskrit and Greek *have a remarkable resemblance,* particularly in those Greek verbs in *Mi,* in which reduplication of the Consonant of the root takes place in the present and imperfect tenses. " P. 245.

( पुढें चालू )

ह्यावरून **ग्रीक** आणि **ल्याटिन** भाषांची व्याकरणपद्धति **संस्कृताहून** अगदीं भिन्न व स्वतंत्र आहे, असें जें **मूरचें** म्हणणें आहे, त्याला सहजींच हरताळ लागते; आणि तें वस्तुस्थितीस अनुसरून नसल्याचें त्यांच्या स्वतःच्याच कबुलीवरूनच उघड ठरतें.

तात्पर्य.

आतां, **मायभाषा** कोणती व तिच्या शाखा कोणत्या, हें सिद्ध करण्यासंबंधानें मुख्यत्वेंकरून आणि विशेष मुद्याची गोष्ट पाहणें आहे ती ही कीं, समाजावस्थेंतील बाल्यदशेंत जे व्यावहारिक शब्द सर्वत्र प्रचारांत असण्याचा ज्यास्त संभव आहे, ते शब्द ज्या ज्या भाषांत पर्यायानें अथवा अपभ्रष्ट स्थितींत दृष्टीस पडतात, त्या सर्व भाषांस शाखा किंवा दुहिता समजून, अशा प्रकारच्या शब्दांचें मूळ रूप, अगर खरें किंवा शुद्ध स्वरूप, ज्या भाषेंत दृग्गोचर होतें; इतकेंच नव्हे तर, तिच्या पलीकडे

मायभाषा व शाखा सिद्ध करण्याची रीत.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

कृदन्तांत सुद्धां, **संस्कृताचें** विलक्षण साम्य **ग्रीक** भाषेंत दृष्टिगोचर होत असल्याविषयीं, **मूरनें** अगदीं निष्प्रांजलपणें कबूल केलें आहे.

"In regard to the *participles* also. *there is a remarkable coincidence* between the Sanskrit and the Greek." P. 250.

सदरहू शब्दांची मीमांसा करण्याला यत्किंचित् देखील अवकाश म्हणून मिळतच नाहीं; त्या भाषेची गणना मायभाषेंत करणें अगदीं अवश्य व यथान्याय दिसतें.

व त्यावरून संस्कृत भाषेचा सिद्ध होत असलेला मातृपदाचा बहुमान.

आणि संस्कृत भाषेची अशाच प्रकारची स्थिति असल्या कारणानें, तिच्याकडे मातृपदाचा (मायभाषेचा) बहुमान आपोआपच चालत येतो; व त्याच कारणानें, झन्द, ग्रीक, ल्याटिन, इत्यादि भाषा तिच्याच शाखा अथवा दुहिता असल्याचें निर्विवाद ठरतें.

# भाग ५३ वा.

## अतिप्राचीन काळीं संस्कृत ही व्यावहारिक भाषा होती, असें मानण्यास कारणें.

प्रस्तुत भागांतील विवेचन, व

अखिल आर्यशाखांची संस्कृत ही मायभाषा असून, तिची जन्मभूमि भरतखंड होय, आणि येथूनच तिच्या शाखा सर्वत्र पांगल्या जाऊन त्यांचा अन्य देशांत प्रसार झाला, अशाविषयीं मागील भागांत आम्हीं विवेचन केलें; व तत्संबंधीं दुसरीही अवश्य ती माहिती दिली. सबब, आतां अतिप्राचीन

संस्कृत भाषेच्या व्यावहारिकत्वाविषयीं विचार.

काळीं, संस्कृत ही व्यावहारिक भाषा होती कीं काय, असल्यास तसें मानण्यास कोणतीं कारणें आहेत, याबद्दलचा थोडासा विचार करूं.

तत्संबंधीं आक्षेप.

ह्यासंबंधानें, प्रथमतः कोणी कदाचित् असा आक्षेप आणील कीं, जी संस्कृत भाषा पूर्णतेच्या केवळ उच्च कोटीप्रत

पोहोंचलेली आहे; जिच्यांत हरतऱ्हेचे संधी क्षणोक्षणीं आढळतात; जिच्यांत नाना प्रकारचें समासप्राचुर्य ठायीं ठायीं व्यक्त होतें; आणि जिच्यांत व्याकरणसंबंधीं तीव्र व कठिण नियमांची परंपरा सतत आढळून येते; ती भाषा व्यावहारिक, किंवा प्रचारांत, अथवा लोकांच्या नेहेमींच्या बोलण्यांत असण्याचा संभवच नाहीं. परंतु थोड्या विचाराअन्तीं, ह्या भ्रांतिमूलक समजुतीचें तेव्हांच निरसन होऊन, ही शंका देखील केवळ निरर्थक असल्याचें सहजीं ध्यानांत येईल.

भरतखंडांत, संस्कृत ही प्राचीन काळापासूनच चालत आलेली व्यवहारिक भाषा होय.

**भरतखंडां**त, फार प्राचीनकाळीं, **संस्कृत** हीच केवळ व्यवहारिक भाषा होती, असें **संस्कृत** ग्रंथसपत्तीवरून चांगलें व्यक्त होतें. **ऋग्वेद** हे आमचे **आदिग्रंथ** असून, ते अति पुराण लेख **आहेत.** फार तर काय सांगावें पण, आमच्या पुराणतम **ऋषिवर्यांचें ऋग्वेद** हे केवळ **स्फूर्तिप्रसाद**च होत, असेंही म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. हे सर्व **गीर्वाण** भाषेंतच आहेत. मात्र भेद म्हणून इतकाच कीं, तें पूर्वींच्या काळचें दुर्बोध **संस्कृत** आहे.

त्याबद्दलचें प्रमाण ऋग्वेद, व नाटकें,

**नाटकां**वरून देखील, नेहमींच्या प्रचारांतील भाषा **संस्कृत** असल्याविषयींच सिद्ध होतें. कारण, त्यांतील प्रतिष्ठित

पात्रें याच भाषेंत आपले विचार प्रदर्शित करीत असल्याचें स्पष्ट दिसतें. आणि नाटक म्हणजे, तत्कालीन आचार व विचार, रूढि आणि संप्रदाय, यांचा प्रत्यक्ष आदर्शच असल्यामुळें, संस्कृत ही पूर्वींच्या काळीं अगदीं व्यवहारिकच भाषा होती, याबद्दल शंका राहत नाहीं.

आणि इतर ग्रंथसंपत्ति.

शिवाय, कर्मकांड किंवा ज्ञानकांड, तत्वविचार अथवा ज्ञाननिरूपण, शास्त्र अगर कला, व्यवहार व आचार, धर्म आणि नीति, काव्य व चंपू, इतिहास आणि भूगोल, इत्यादि अथपासून इतिपर्यंतची यच्चावत ग्रंथसंपत्ति, संस्कृत भाषेंतच आहे. यावरून देखील, ही गीर्वाण भाषा फार प्राचीनकाळींसुद्धां केवळ व्यवहारांतलीच होती, हें निर्विवाद आहे.

तद्विषयक पौरस्त्यांचें व पाश्चात्यांचें मत.

एतद्विषयक जसें पौरस्त्य[१] मत आहे, तसेंच पाश्चात्य मतही असून, पूर्वीं संस्कृत ही व्यवहारिकच भाषा असल्याबद्दल बड्या बड्या विद्वानांचें मत आहे.

फार पुरातन काळीं, संस्कृतभाषा लोकव्यवहा-

१ Dr. Hunter's Indian Empire. P. 334.
(Second Edition.)
भारतीयांचें असें मत आहे कीं, सर्व प्राकृत भाषा आणि त्यांच्या इतर शाखा ह्या संस्कृतापासूनच उद्भवल्या आहेत.

शंकर पांडुरंग पंडिताचें मत.

रांतील असल्याविषयीं कित्येक पाश्चात्य पंडितांचें ज्याप्रमाणें मत आहे, त्याचप्रमाणें कांहीं पौरस्त्य पंडितांचा देखील अगदीं ठाम अभिप्राय आहे. विद्वन्मुकुटमणि राजमान्य-राजश्री शंकर पांडुरंग पंडित हे ऋग्वेदाचें भाषान्तर करतांना टीकेंत असें लिहितात कीं, " ऋज्राश्वस्य"च्या ऐवजीं " ऋजराशुअस्य " असें वृत्तासाठीं म्हणावें लागतें. आणि तसें म्हटलें तर, ऱ्हस्व दीर्घांची विशेष ओढाताणही होत नाहीं. वृत्ताच्या नियमांत, अशा प्रकारचे स्वाभाविक अपवाद ज्या कवितेंत पुष्कळ, किंबहुना विशेष दिसून येतात, ती बहुतकरून चालू किंवा प्राचारिक भाषेंतच रचलेली असते. ही वेदसूक्तांतील कविता ज्यावेळीं वेदकवींनीं गाइली, त्यावेळीं आर्य लोक संस्कृत भाषा बोलत असावेत. या " अनुमानाला दुसरींही प्रमाणें आहेत. त्यांतून एक हें होय कीं, वेदसूक्तांमध्यें लांब लांब समास नसून, त्यांची जी भाषा ती कृतक नाहीं. तर साधारण लोकांला समजण्यासारखी सुलभ आहे. दुसरें असें कीं, अलीकडील संस्कृतांत जे कठिण कठिण संधि होतात, ते वेदांत बहुतकरून होत नाहींत. आणि साधारण संधि सुद्धां केव्हां केव्हां मुळींच होत नसतात.[1] "

---

१ वेदार्थयत्न. पु. २, अंक १०, मार्च सन १८७८, मासिक भाग २४, पान ५९३.

आफ्रेचटूचा अभिप्राय.

प्रोफेसर आफ्रेचट्चें असें मत आहे कीं, ऋग्वेदांत जी भाषा वापरली आहे, ती व्यावहारिक भाषा असून, ती अखिल भरतखंडभर नाहीं तरी, आर्यांचें मूळनिवासस्थान जें पंजाब त्यांत खचितच प्रचारांत होती. कारण, प्राकृत भाषा वेदकाळींही व्यवहारांत असल्याविषयींचें वेबरचें म्हणणें खोडून काढून तो असें म्हणतो कीं,

" I consider that in his account of the origin of the Prakrit dialects, Professor Weber *goes much too far in stating them to be contemporaneous with* the Veda dialect. The examples which he gives are, I conceive, partly *erroneous*, partly collected from *late* books, and consequently *unsuited to establish his assertion. I incline to the opinion that the language* of the Rigveda *was at one time universally spoken*, not through the whole of India, but the Punjab, that is *in the original seats of the Aryans.* "

( सद्रहू अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ) ग्रंथकर्ता.

मूरचें मत.

डाक्तर जॉन् मूर हा असें प्रतिपादन करतो कीं, पूर्वींच्या काळीं, संस्कृत भाषाच कायती प्रथम प्रचारांत होती; आणि तद्वारेंच लोक आपापले विचार प्रदर्शित करीत. तो म्हणतो,

21972

" The Sanskrit was originally *a spoken language,* and *the old spoken language* of India and the Sanskrit of the Vedas, were at one time identical. "

( Muir's Sanskrit Texts. vol. II.
P. P. 140/160. Edited 1874. )

प्रोफेसर बेन्फेचें देखील असेंच मत आहे. आणि त्याच्याच जोडीला लॉसनूचा सुद्धां असाच मासल्याचा अभिप्राय आहे.

बेन्फेचें व लासनूचें मत.

---

१ " The Sanskrit-Speaking migrations from beyond the Himalayas continued to follow one another into India down to perhaps the 9 th century B. C. That Sanskrit became the *prevailing Indian vernacular dialect through out* Hindustan, and as far as the southern borders of the Maràtha Country. That it began to die out as a spoken language from the 9 th century B. C.; and had become extinct as a vernacular in the 6th century B. C.; its place being taken by derivative dialects or Prakrits. But that it still lingered in the Schools of the Bráhmans; and that, about the 3 rd Century B. C., it was brought back into publlc life as a Sacred lauguage. wit.h a view to refuting the Buddistic teachers, who wrote in the vernacular, or Prakrit dialects. * * * Sanskrit had *diffused itself over the whole of India,* as *a literary languvge.* "

( *Dr.* Hunter's Indian Empire. P. 334/335. )

संस्कृत भाषा पूर्वींच्या काळीं व्यवहारांतलीच असल्यामुळें सर्वांच्या प्रचारांत असे; आणि म्हणूनच ती **मायभाषा** बनून राहिली होती, अशाविषयीं दुसऱ्या एका पाश्चात्य शोधकाचें देखील मत आहे. **रेव्हरंड क्यॉल्डवेल** हा असें म्हणतो कीं, **संस्कृत** हीच **ब्राह्मणांची** पिढीजात व्यावहारिक भाषा होय.

" And Sanskrit, though now regarded only as an accomplishment or as a professional acquirement, is *property* of their (Brahmans') *ancestral* tongue."

असो. पूर्वींच्या काळीं, आणि आमच्या पुराणतम **आर्यऋषींनीं ऋग्वेद** ऋचा गाइल्या तेव्हां देखील, **संस्कृतभाषा** ही नेहमींच्या प्रचारांतली आणि लोकव्यवहारांतलीच होती, असें अनुमान करण्यास आणखी एक विशेष बलवत्तर कारण मिळतें. तें हें कीं, ऋग्वेदाच्या भाषासरणींत कोणतीही ओढाताण केलेली दिसत नाहीं. इतकेंच नव्हें तर, त्यांतील ऋचांवरून तत्कालीन भाषेचें स्वरूप देखील अगदीं साधेंसेंच

संस्कृत भाषा व्यावहारिक होती, अशा विषयींचीं कारणें.

१ A comparative Grammar of the Dravidian or South-Indian Family of Languages. By the Rev. R. Caldwell B. A. missionary. Southern India.

( P. 2 )

भासतें. कारण, त्यांतील वृत्तांच्या नियमांत मधून मधून बरेच अपवाद आढळून येतात; आणि साधारणतः संधि-नियमाच्या बंधनानें देखील त्या एकसारख्या नियंत्रित झालेल्या दिसत नाहींत.

ऱ्हस्वदीर्घाचें तीव्र बंधन, अक्षरसंख्येचें मापन, आणि अनेक समासांचें प्राचुर्य, हीं बहुतकरून प्राचारिक भाषेंत सहसा दृष्टीस पडत नाहीं. कारण, जितक्या प्रमाणानें साधे शब्द असतील; किंवा जितक्या अंशानें सर्वांसच समजण्यासारखी सुलभ वाक्यरचना असेल; अथवा नेहेमींची भाषासरणी जेवढी म्हणून साधी, अगर जितकी बोलण्यास सोपी पडेल; तितकीच ती सर्व साधारणपणें, बहुजनसमाजास विशेष प्रिय होते, व सर्वांसच आवडते. आणि त्याच कारणानें, व्यवहारांत देखील लोक तिचाच उपयोग करितात.

ऋक्कवींचें निर्बन्धन.

**ऋग्वेदांत** ही गोष्ट अगदीं प्रत्यक्ष रीतीनें विशेष प्रत्ययास आल्यासारखी दिसते. कारण, ह्यांतील ऋचांत लांबलांब समास नाहींत, अथवा ह्यांत कोणत्याही प्रकारचें कृत्रिम बंधनसुद्धां दृष्टिगोचर होत नाहीं. ज्या ज्या कवीला जसजसे विचार सुचले, तसतसे त्यांनीं थोडक्यांत आणि अनलंकृत भाषेंत जसेच्या तसेच व्यक्त केले आहेत. त्यांना जी गोष्ट जशी आठवली तशी त्यांनीं आपणांस कळविली

आहे. ज्याला जसें बोलावेसें वाटलें तसें तो मोकळें मन करून बोलला आहे. . आणि जशी ज्याला स्फूर्ति झाली, तशी त्यानें आपणांपुढें हुबेहुब मांडिली आहे.

त्यांची वाक्सरलता.

ह्या ऋचा गात असतांना, वृत्तांतील मात्रा बरोबर करण्यासाठीं, आमच्या आदि-कवींची केव्हांही धांदल झालेली नाहीं. किंवा, भाषासौन्दर्याच्या हेतूनें, त्यांनीं लांब-लांब समासांचीही योजना केलेली नाहीं अथवा वाङ्-माधुर्यार्थ, भाषेच्या सरणींतही त्यांनीं बदल केला नाहीं. अगर, पदलालित्यासाठीं, त्यानीं आपल्या लेखनपद्धतींतही काडिमात्र फेरफार केल्याचें दिसत नाहीं.

संस्कृत भाषेची महाराष्ट्र भाषेच्या स्थितीशीं तुलना, व त्यांचें व्यावहारिकत्व.

मयूर कवीची अत्यलंकृत भाषा आणि थोडीबहुत कृत्रिम कविता, व तुकारामाची साधी वाणी आणि त्याचा स्वभावसिद्ध अभंग, यांची तुलना केली ह्मणजे तुकोबाची भाषासरणी विशेष प्राचारिक आणि व्यावहारिक होती, असें कोणाच्याही लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं. आतां, जशी तुकारामाची कविता मराठी होती, तशी मोरोपंताची देखील मराठीच खरी. परंतु, तुकारामाच्या अभंगांत मराठी भाषेला सजविण्याचा तिळभर देखील प्रयत्न नसून, तीच अनन्तशब्दरत्नांनीं अलंकृत करून नांवा-

रूपास आणण्यासाठीं, **मयूर** कवीनें तींत भाषागांभीर्याची जणुकाय **मूसच** ओतली; अर्थगौरवाचें जणुकाय त्यानें कोन्दणच केलें; आणि पदलालित्याची तींत अगदीं गर्दी करून देऊन, **महाराष्ट्रभाषारूपी** आयसास त्यानें आपल्या प्रसादिक वाणीचा जणुकाय **परीसच** लाविला, व तिला मोठ्या उच्चपदवीप्रत चढविलें.

त्याचप्रमाणें, **संस्कृत भाषेची** स्थिति होय. ही भाषा प्रथमतः **प्रचारांत** होती तेव्हां, परिधानार्थ तिच्यावर अगदींच साधें वस्त्र असून, ती केवळ त्या अवस्थेंतही एकाद्या मुग्धबालेप्रमाणें मनोहर दिसे. पुढें कालान्तरानें, **वाल्मीकि, व्यास,** इत्यादि महाकवींनीं तिच्यावर शनैः शनैः फारच मोहक व चित्ताकर्षक भूषणें चढविण्याची सुरुवात केली; आणि तदनंतर, **कालिदास, भवभूति, बाण, दंडी,** इत्यादि कविरत्नांनीं तिला जणुकाय लावण्याची अद्वितीय प्रतिमाच बनविली. किंबहुना, आपापल्या इच्छेनुरूप अनेक कविवरांनीं तिला केवळ **मालती**प्रमाणेंच अत्यन्त मनोहर बनवून, तिला लावण्याची जणूकाय खाणच केली. त्यामुळें,

संस्कृत भाषेची रमणीयता.

**सा रामणीयकनिधेरधिदेवतावा**
**सौन्दर्यसारसमुदायनिकेतनंवा ।**

असें तिच्याबद्दल अखिल जनसमूहास सहजीं वाटूं लागलें.

अथवा, मालविकाग्निमित्रांत लिहिल्याप्रमाणें, हरदत्ताला राजाकडे पाहून ज्याप्रमाणें प्रतिक्षणीं अत्यंत विस्मय वाटूं लागला, व त्याच्या ऐश्वर्याचें विलक्षण तेज सहन न होऊन, त्याचे नेत्र ज्याप्रमाणें वारंवार सकौतुकाश्चर्य दिपत चालले, त्याचप्रमाणें ह्या अत्यन्त मनोहर अशा संस्कृतभाषाकुलवधूकडे पाहून, आम्हा सर्वांची स्थिति व्हावी, यांत नवल तें कोणतें?

तिचा परिचय, व तदुद्भूत कुतूहलजागृति.

ह्यासंबंधानें खरोखर विचार केला तर, असें कोणाच्याही सहजीं लक्षांत येऊन चुकेल कीं, संस्कृतभाषेशीं आमचा अत्यंत परिचय असल्यामुळें ती आम्हांस कोणत्याही प्रकारें अगम्य नाहीं. इतकेंच नव्हें तर, ह्या भाषेचें अनुपम सौन्दर्य आम्हीं आज हजारों वर्षें एकसारखें अवलोकन करीत आहोंत. तिच्यांतील उदात्त श्री अखिल जनांच्या हृत्पटिकेवर सदैव परिणाम करीत आहे. तिच्यांतील सुरम्य पदलालित्यानें आमच्या कर्णरन्ध्रांचें नित्यशः पारणें फिटत आहे. आणि तिच्यांतील अपूर्वरसमाधुर्यानें आमचे अष्टभाव एकदम प्रकट होऊन, त्यांचें निरंतर पोषण होत आहे. तथापि, इतकेंही असून, ह्या लावण्यखाणींतल्या अत्युज्ज्वल रत्नांची प्रत्येक वेळीं अगदीं निरनिराळ्या तऱ्हेची व अदृष्टपूर्व अशी,

त्याचें कारण.

विलक्षणच चमक भासमान होते. त्यामुळें, तिच्यांतील नितान्तमाधुर्य आणि प्रौढता, प्रसाद व सरलता, श्लेष आणि सुकुमारता, यांविषयीं क्षणोक्षणीं महादाश्चर्य वाटून, अर्थव्यक्ति व रमणीयता, उदारत्व आणि ओजस, अर्थ-गांभीर्य व कांति, या बाबतींत आमचें कुतूहल सतत जागृत राहतें.

सबब, संस्कृत भाषेच्या संबंधानें,

**नचन परिचितो न चाप्यगम्य**
**श्चकितमुपैमि तथापि पार्श्वमस्य ॥**
**सलिलनिधिरिव प्रतिक्षणं मे**
**भवति स एव नवो नवोऽयमक्ष्णोः ॥**

( मालविकाग्नि मित्र. )

ह्या श्लोकांत लिहिल्याप्रमाणें हरदत्तासारखीच आमची अवस्था होऊन, **कालिदास** कविश्रेष्ठाची **अग्निमित्राला** लाविलेली उक्ति, **संस्कृत** भाषेच्यासंबंधानें देखील, अगदीं खरी ठरूं पाहते.

भाषेची उन्नति व तिचें व्यावहारिकत्व, यांची अभिव्याप्ति.

असो. अशा प्रकारें, जी भाषा अनेक कविगणांच्या साहाय्यानें मनोहर बनली; किंवा त्यांच्या अप्रतिहतप्रयत्नांनीं जी सुसंस्कृत अथवा अतीव अलंकृत झाली; ती येवढ्याच कारणामुळें, व्यावहारिक भाषा नव्हती, असें मात्र म्हणण्यास खरोखरच अडचण आहे.

कारण, **वामन**, **श्रीधर**, **मुक्तेश्वर**, **मयूर**, इत्यादि कविगणांनीं सुसंस्कृत केलेली **मराठी भाषा**, ती केवळ उच्चपदवीप्रत चढली, येवढ्याचसाठीं जशी व्यवहारातीत मानतां येत नाहीं, त्याचप्रमाणें, **संस्कृतभाषा** अलंकाराची निव्वळ खाण बनली म्हणून, ती प्रचारातीत होती, अथवा ती **मृतभाषा** झाली, असेंही प्रतिपादन करण्यास खरोखर प्रत्यवायच दिसतो.

त्यासंबंधानें वेबर प्रभृतींचे आक्षेप.

ही अति पुराण **संस्कृत** भाषा व्यावहारिक असण्याच्या बाबतींत, **वेबर** प्रभृतींचेही अशाच मासल्याचे आक्षेप आहेत. ते असें ह्मणतात कीं, ही भाषा परिपूर्णतेच्या अगदीं उच्च कोटीप्रत पोहोंचलेली असून, गणादिरूपें, समासप्राचुर्य, संधिनियमन, विभक्तिप्रत्यय, इत्यादि संबंधानें तिची रचना फारच गहन आहे. सबब, ती प्रचारांत असल्याचें बिलकुल संभवत नाहीं.

त्याचें निरसन.

परंतु, हा आक्षेप केवळ निरर्थक असून, अगदीं निराधार आहे. इतकेंच नव्हें तर, तो प्राचीन काळच्या अन्य भाषांच्या मुकाबल्यानें व तुलनेनें, क्षणभर देखील टिकाव धरूं शकणार नाहीं. कारण, **ल्याटिन्** भाषेच्या विभक्त्यादि प्रत्ययांत सुद्धां असेंच वैचित्र्य असून, ती देखील अखिल **रोमन्** लोकांची व्यवहारिक भाषा होती. मग,

संस्कृत ही नेहेमींच्या प्रचारांतील भाषा नव्हती, असें प्रतिपादन करण्याला कोणतेंही सबळ कारण मिळत नाहीं.

आतां, अशा प्रकारची अवघड आणि कठिण भाषा बोलण्याचा ज्यांना बिलकुल परिचयच नाहीं; अथवा, ज्यांची भाषा विशेष सोपी असल्याकारणानें, तींत अशा प्रकारचें तीव्र नियमनही दृष्टिगोचर होत नाहीं; किंवा, ज्यांची भाषा उन्नतीच्या उच्च कोटीप्रत न पोहोंचल्यामुळें, ज्यांना अर्थगांभीर्याची व पदलालित्याची संवय नाहीं; अगर, समासप्राचूर्य ज्यांच्या स्वप्नांत सुद्धां येत नाहीं; त्यांना आमच्या संस्कृत भाषेच्या व्यावहारिकत्वाबद्दल मोठें गूढ वाटून, ते तद्विषयक नसते कुतर्क काढीत बसतात, हें अगदीं साहजिक आहे.

ह्याचें प्रत्यक्ष उदाहरण आपण आपल्या देशांतलेंच घेऊं.

त्याचा दाखला.

आमचे **वारली, कातकरी, कोळी, ठाकूर,** आणि इतर जंगली जातींतील लोक फारच रांगडी भाषा बोलतात. त्या कारणानें, आह्मी जी **मराठी** भाषा बोलतो, व नानाविध शब्दांचें स्पष्टोच्चारण करितों, त्याचें त्यांस मोठें नवल वाटतें. परंतु आह्मांस त्याबद्दलचें यत्किंचित् देखील आश्चर्य वाटत नसून, ती आमची मुलेंबाळेंसुद्धां सर्रास्त आणि अस्खलित बोलतात.

तेव्हां, तात्पर्य म्हणून इतकेंच कीं, ज्यांना ज्या गो-

ष्टीचा बिलकुल अभ्यास नाहीं, व जी गोष्ट त्यांनीं कधीं पाहिलेली किंवा ऐकिलेलीही नाहीं, त्यांना ती साहजीकच अशक्य आणि दुर्घटशी वाटते. परंतु, तीच संवईनें व अभ्यासानें, केवळ सोपी आणि नेहेमींचीच होऊन जाते.

ग्रीक व ल्याटिन भाषांचें काठिण्य व व्यावहारिकत्व.

**ग्रीक** आणि **ल्याटिन्** ह्या आपल्याला फार कठीणशा भाषा वाटतात. तथापि, **ग्रीस** देशाच्या उन्नतावस्थेंत, व **रोमक** साम्राज्याच्या वेळीं, त्या प्रत्यक्ष व्यवहारांतच असल्यामुळें, ते लोक ती सहजीं बोलत, आणि त्यांस तिचें लेशमात्रही काठिण्य वाटत नसे. तथापि, ह्या दोन्ही हल्लीं **मृतभाषा** होऊन, त्यांच्या ऐवजीं अर्वाचीन **ग्रीक, इतालियन्, स्पॅनिश, फ्रेंच,** इत्यादि **प्राकृत** भाषा प्रचारांत आल्या आहेत.

त्याचप्रमाणें संस्कृत भाषेची स्थिति.

त्याचप्रमाणें, **संस्कृत**, भाषेचेंही झालें असून, **हिंदु साम्राज्यांत** ती हजारों वर्षें एकसारखी व्यावहारिक भाषाच होती. मात्र, ज्ञानार्जनासाठीं व दिग्विजयार्थ, आमचे **हिंदु-आर्यवीर** जसजसें सर्वत्र पसरले, तसतसे **संस्कृत** भाषेचें पोट विभाग होऊन, तिच्यापासून **फारसी, ग्रीक, ल्याटिन**, इत्यादि पाश्चात्य शाखा, आणि **पाली, मराठी, बंगाली, गुजराथी, हिन्दी**, इत्यादि पौरस्त्य शाखा, कालान्तरानें उद्भवल्या. तथापि, मूळ**संस्कृत**भाषा कित्येक

वर्षे, किंबहुना अनेक शतकेंही, सतत प्रचारांत होती, यांत अगदीं संशय नाहीं.

वेदकालीन संस्कृत व तदनंतरच्या संस्कृतांत फेर, व त्याचें कारण.

आतां, ही गोष्ट खरी आहे कीं, वेदकालीन संस्कृत हें रामायणकालीन संस्कृताहून कांहीं अंशांनीं भिन्न असून, ह्यांत आणि महाभारतकालीन संस्कृतात, व कालिदास भवभूति प्रभृति कविकुलावतंसाच्या संस्कृतांत, बहुत अन्तर आहे. तथापि, तेवढ्यावरूनच, त्या त्या काळची संस्कृत भाषा त्या त्या वेळीं प्रचारांत नव्हती असें खचितच म्हणतां येणार नाहीं. कारण, जसजसें सुधारणेचें पाऊल पुढें पडतें; ज्यामानानें पंडित आणि विद्वज्जनांचें भाषेला सहाय्य मिळतें; ज्याप्रमाणानें कविगणांच्या नानाविध चमत्कृतींनीं तिजवर अत्यन्त मनोहर अलंकार चढतात; आणि जितक्या अंशानें तिला रमणीयता व सौन्दर्य प्राप्त होतें; तितक्याच अंशानें तिच्यांत शनैःशनैः विलक्षण स्थित्यन्तर होत जाऊन, तिला अपूर्व चारुता येते. इतकेंच नव्हे तर, वाङ्माधुर्य, प्रौढी, ओजस्, व्यंजकता, प्रसाद, पदलालित्य, इत्यादि नानाप्रकारच्या अप्रतीम गुणांची ती केवळ लावण्याची खाणच बनून, पूर्णतेच्या अगदीं उच्चकोटी प्रत चढते.

ग्रीक व ल्याटिन् ह्या भाषा प्राचीन काळीं व्यावहा-

लिहिण्याच्या व बोलण्याच्या भाषेंत अन्तर.

रिक होत्या, हें कोणास देखील नाकबूल करवणार नाहीं. तथापि, ग्रीक आणि रोमन् लोकांची जी नेहमींची व्यावहारिक भाषा असे, तींत व त्यांच्या नांवाजलेल्या वक्त्यांच्या भाषेंत बरेंच अंतर दिसून येतें.

पण, फार दूर जावयासच नको; आणि एवढा द्राविडी प्राणायामही करावयास नलगे. कारण, हल्लीं सांप्रतकाळीं देखील, कोणीही ग्रंथकार आपल्या ग्रंथांत, नेहेमींच्या प्रचारांत असलेल्या नेभळ्या, ग्राम्य, आणि अनलंकृत भाषेचा उपयोग न करितां, तिच्यांत ठिकठिकाणीं भारदस्तपणा आणून, तिला सजवून, व तिच्यावर मनोहर अलंकार चढवूनच तो तिचा उपयोग करतो, हें निर्विवाद आहे.

लॉसनूचें तद्विषयक मत.

ही गोष्ट लॉसनूनें सुद्धां आपल्या प्राक्कालीन भारतवर्षांत साफ कबूल केली आहे. तो असें म्हणतो कीं,

" The Athenians and Romans certainly did not, in their ordinary life, *express* themselves in the *same style* in which their *orators spoke*; and we Germans permit, ourselves to *make use of many turns of expression which we deny ourselves in books.* "

---

१ Lassen's Indian Antiquities. vol. II. P. P, 1147 @ 1153.

बोलण्याच्या प्रचारांतील भाषा ग्रंथांतील भाषेहून कांहींशी भिन्न असते, हें डाक्तर मूरच्या लेखावरून देखील स्पष्ट होतें. कारण, तो असें म्हणतो कीं,

मूरचा अभिप्राय.

The *language of conversation always differs to some extent from the language of formal composition or of books,* and the vernacular Sanskrit was no doubt undergoing a perpetual alteration till it merged into Prakrit."

( Muir's Sanskrit Texts. vol. II.
2nd Edn. P. 146. )

बरें, ही संस्कृत भाषा फार प्राचीन काळीं देखील, लहानशा अथवा थोडक्या टापूंतच प्रचारांत होती, असें नाहीं. तर तिची व्यापकता बहुत असून, तिचा फैलावही पुष्कळ होता. आणि काबूल प्रांतापासून तों तहत ब्रह्मपुत्रा-नदीपर्यंत, व हिंदुकूश आणि हिमालय पर्वतापासून तों थेट महाराष्ट्र देशाच्या दक्षिण सरहद्दीपर्यंत व त्यांच्याही पलीकडे, ती केवळ व्यावहारिक भाषाच होती. महाराष्ट्र देशाच्याही पलीकडे दक्षिण बाजूला, ती प्रचारांत होतीच. परंतु, तिचा विशेष रीतीनें फैलाव नव्हता. त्यामुळें, फक्त विद्वान आणि उच्च वर्णांतले लोक मात्र ती व्यवहारांत बोलत असत.

संस्कृत भाषेची प्राचीन काळची व्याप्ति.

अशा प्रकारें, **संस्कृत** भाषेची व्यापकता व तिचें

बौद्ध धर्मामुळें तिचा झालेला संकोच,

व्यावहारिकत्व थेट **अशोक** बादशहाच्या वेळेपर्यंत, अगदीं अप्रतिहत चाललें, असें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु, ह्याच्या कारकीर्दींत, आणि पुढें कांहीं काळपर्यंत, **बौद्ध** धर्माचें प्राबल्य बरेंच वाढल्यामुळें, ह्या धर्माचा **प्रसार** देशोदेशीं, आपल्या **साम्राज्यांत**, व अन्यत्र करण्यासाठीं, या **सार्वभौम राजानें** ठिकठिकाणच्या देशीभाषेंत सदरहू नूतन धर्माचें तत्व नमुद करून, तत्प्रसारार्थ एकसहा राजाज्ञा फर्माविली.

व मर्यादित प्रसार.

**अशोकाची** कारकीर्द संवत शकापूर्वीं सुमारें ३०० वर्षें असून, त्याच्यापूर्वीं **संस्कृत** भाषा सरास्त प्रचारांत होती. तथापि, **अशोक** बादशहाच्या वेळीं व त्यानंतर, ती अगदींच व्यवहारातीत होती, असें नाहीं. तर, विद्वान लोक आणि उच्चवर्ण हीच भाषा बोलत; मोठमोठ्या पाठशाळांतून देखील हीच भाषा चाले; व शास्त्रीय आणि गहन विषयांचें विवेचनही ह्याच भाषेंत होई. फार तर काय सांगावें पण, प्रत्यक्ष **बौद्ध** धर्मानुयायी पंडित सुद्धां,

---

१ म्हणजे, ह्या गोष्टीला आज सुमारें सव्वादोन हजार वर्षें झालीं, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

हीच भाषा वापरीत; आणि धर्मसंबंधीं हरएक प्रकारची भवति न भवति ह्याच नामांकित व पवित्र भाषेंत करीत.

ब्राह्मण धर्माचें पुनरुज्जीवन, व संस्कृताची तेजी.

पुढें, अशोकानंतर, ब्राह्मण धर्म पुनश्च जोरावत चालला, आणि बौद्ध धर्माचें प्राबल्य सहजींच कमी होत जाऊन, त्याला दिसानुदिवस एकसारखी ओहोटीच लागली. त्यामुळें, संस्कृत भाषेला ही अर्थातच तितक्या प्रमाणानें अधिकाधिक तेजी येऊन, तिचा पूर्ववत् विशेष फैलाव झाला, आणि तिचें आपोआपच महत्व वाढलें.

संस्कृत ही जिवंत भाषा असल्याविषयीं बेन्फेचें मत.

प्रोफेसर बेन्फेनेंही एके ठिकाणीं असें साफ लिहिलें आहे कीं, फार प्राचीन काळीं, संस्कृत ही विशेष प्रचारांत असून, ती जिवंत भाषा होती. त्यामुळें, व्यवहारांत व राजदरबारांत, विद्यालयांत आणि पाठशाळांत, घरीं व दारीं, तिचाच उपयोग करण्यांत येई. इतकेंच नव्हे तर, बौद्धांचें देखील तिच्यावांचून अगदीं अडे, आणि बिलकुल चालत नसे. कारण, हिंदूंची राजकीय जूट आणि एकी चांगली असल्या कार-

---

१ Prof. Benfey's article on India.

ह्यापैकीं खालीं नमुद केलेल्या अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ( ग्रंथकर्ता. )

णानें, त्यांचें भारतवर्षांतील साम्राज्य फारच विसृत होतें. त्यामुळें, अखिल हिंदू सांम्राज्यांत संस्कृत भाषेचें वर्चस्व उघडच असे.

प्रो. वेन्फे ह्मणतो:——

" During this and the immediately preceding period, there existed, as we have already conjectured, a *political union which embraced the entire* Indian Empire, and as we know that Sanskrit *must have been the actual* speech *of the people in the* Mahratha country *also, at the period*, we may conceive the political union *to have extended from* the Himalaya *to the* Mahratha country. " * * *

" The literature which had been created in Sanskrit, while *it was yet a living tongue*, was still preserved in the schools of thg Brâhmans, and along with it the Sanskrit itself as the Sacred language of culture and Science. " * * *

" When the Brähmans recovered their predominance, Sanskrit *became for a time the lauguage of the educated classes; of the Court*, and the adminisration generally: and *even the* Buddists *could not abstain from employing so valuable an instrument of cultivation.* * * *

" About the 3 rd Centuary B. C., in consequence of Brahmanism in Kanouj, it (San-

skrit) *was brought back into public life* as a sacred language, and *gained a gradually increasing importance as the organ of* all *the higher intellectual development.* About the fifth century A, C,, it had become dlffused in this character, *over the whole of* India. *So long as the* Empire *of Hinduston lasted, it continued to increase in estimation* and *even long after the* Mahamedans had settled in India, *it was almost* the sole instrument for the expression of the highest intellectual efforts."

तद्विषयक मूरचें मत.

संस्कृत भाषा अति प्राचीनकाळीं प्रचारांत असे; इतकच नव्हे तर, आर्यांच्या उदयकाळापासून तीच त्यांची केवळ व्यवहारिक भाषा ही बनली होती, अशाविषयीं डाक्तर मूरनें आपलें मत स्पष्ट रीतीनें प्रदर्शित केलें असून, तो आणखी असें देखील लिहितो कीं, ज्यांची भाषा सोपी आणि साधीभोळी आहे, व ज्यांस संस्कृतासारखी कठिण भाषा बोलण्याचा बिलकुल अभ्यासच नाहीं, त्याजला ती प्रचारांत असल्याविषयींचें अशक्य व असंभवनीयसें वाटवें, हें अगदीं साहजीक आहे. आणि जर, पालि व इतर प्राकृत भाषांची रचना गूढ असून ही, त्या व्यावहारिक असल्याचें प्रत्यक्ष दृष्टिगोचर होतें, व आपण धडधडीत पाहतों, तर संस्कृत भाषाच प्रचारांत

असत्याबद्दलची कां शंका यावी, हें मुळींच ध्यानांत येत नाहीं.

तो म्हणतो:—

* * * " The upper classes of the population of the Arian race, * * * *must have been in the habit of speaking* Sanskrit ( *by which must be understood the then current form or forms of the old* Aryan *speech* ), a few ages previously, *for, in fact, no other Arian language then existed in India, which they could have used.* " * * *

" The *complex structure* of a language, i. e. the multitude of its forms of inflection and conjugation, which, to those *who are occustomed to a simpler form* of speech, *may appear to afford grounds for doubting that a language of the former description could ever have been vernacularly spoken,* is in fact rather an *argument in favour of that supposition;* for, such *complexity* of structure *appears* to be *a characteristic* of language as it exists in the *earlier stages* of society, whilst the *dialects* formed out of these earlier tongues, on their decay, are observed to become *simpler* in their forms. This is *exemplified* in the case of the Latin and *its derivatives.* "

( Muir's Sanskrit Texts. vol. II.
2 nd Edition. P. P. 145/150. )

वरील अवतरणांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ( ग्रंथकर्ता. )

तथापि, मूर[1] प्रभृतींचें ह्याखेरीज आणखी असेंही मत आहे कीं, ज्यावेळीं भरतभूमींत आर्यहिंदू हे संस्कृत भाषा बोलत असत, त्याचवेळीं अनार्य वर्गांची भाषा देखील प्रचारांत असून, ती दस्यु वगैरे अनार्य लोक वापरीत; व हेच कायते भरतखंडांतले मूळचे राहणारे असल्यानें त्यांजला आह्मीं आर्यांनीं भरतबाह्य प्रदेशांतून येऊन जिंकलें, आणि आम्ही आपली संस्कृत ( अर्थात् आर्य ) भाषा येथें मागाहून सुरू केली.

आर्य व अनार्य भाषा समकालीन असल्याबद्दल, मूरचा अभिप्राय.

परंतु, हें त्यांचें म्हणणें बिलकुल संभवनीय दिसत नसून, ते आपल्या म्हणण्याच्या पुष्टीकरणार्थ, बलवत्तर असें एकही प्रमाण पुढें आणीत नाहींत.

शिवाय, आम्ही परकी, व दस्यू एतद्देशीय, असेंच जर खरें असतें, तर आम्हांला ह्या भरतखंडाची, व येथील नद्या, पर्वत, डोंगर, इत्यादींची बिलकुल माहिती नसल्या कार-

त्याचें निरसन.

---

१ मूर म्हणतोः—

" Even though *we assume,* as we must do, **that** *there were, from the earliest times, other forms of spoken language current i India besides* the Sanskrit; *yet there would be the dialects* of the Dasyus, or non-Arian tribes. "

( Muir's Sanskrit Texts. vol. II. P. 148. 2nd Edn. )

णानें, सदरहू यच्चावत् स्थलांस, **अनार्यांनीं** ठेविलेल्या नामधेयांचाच आम्हीं निःसंशय उपयोग केला असता. आणि **अनार्यांचा** व आमचा अगदीं निकटसंबंध जोडला गेल्यामुळें, आमच्या **संस्कृत ( आर्य )** भाषेंत **अनार्य** शब्दांचें, आणि विशेष व सामान्य नामांचें, खचितच पुष्कळच मिश्रण झालें असतें. परंतु, विशेष आश्चर्य हें कीं, **अनार्य** शब्दांचा लेशमात्र ही तत्कालीन ह्मणजे **वैदिक संस्कृतांत** दिसून येत नाहीं. इतकेंच नव्हे तर, **आर्यावर्त** हें केवळ आमचें मागील दार व माहेरघरच असल्याप्रमाणें आमची स्थिति असून, ह्या **भरत भूमींतील** स्थावरजंगमादि झाडून सर्व वस्तू, फक्त **संस्कृत** नांवांनींच सर्वांस विश्रुत आणि महशूर झाल्या आहेत.

असो. ह्यासंबंधाचें साद्यन्त विवेचन, **भारताचें भरतखंड** अथवा **आर्याक्रमणाचा मिथ्याप्रवाद** नांवाच्या पुस्तकांत आह्मी केलें असून, तेथेंच ह्या अति महत्वाच्या प्रश्नाच्या सर्व बाजू, मी आपल्या अल्पसमजुतीप्रमाणें, वाचकापुढें यथावकाश ठेविल्या आहेत. सबब, येथें तत्संबंधीं, आणखी ज्यास्त ऊहापोह करण्याचें प्रयोजन नाहीं.

आतां, **संस्कृत** भाषा प्राचीन काळीं प्रचारांत नव्हती असें क्षणभर विवादहेत्वर्थ मानावें, तर ती गोष्ट कोण-

---

[१] **भारतीय साम्राज्य.** उत्तरार्ध. पुस्तक १६ वें.

संस्कृत भाषा प्रचारांत नव्हती, अशा विषयीं प्रमाणाभाव.

त्याही प्रमाणांनीं म्हणून बिलकूल सिद्धच होत नाहीं. इतकेंच नव्हें तर, तशी कल्पना करण्यास देखील तिळभरही अवकाश मिळत नाहीं. कारण, **संस्कृत** भाषा व्यवहारांतच नसती तर, तिच्या ऐवजीं दुसरी कोणती तरी भाषा, अगर तिचे पोटभेद, खचितच प्रचारांत असते. परंतु, तसे असल्याविषयीं, लेशमात्रही प्रमाण उपलब्ध होत नाहीं; अथवा, कोणताही पुरावा पुढें येत नाहीं.

परंतु तिच्या व्यावहारिकत्वाबद्दल, संस्कृत ग्रंथांतलींच प्रमाणें.

आतां, **संस्कृत** भाषा प्रचारांत असल्याबद्दल आपल्याला अनेक प्रमाणें मिळत असून, तीं ह्या विशाल **संस्कृत** ग्रंथोदधींतच उपलब्ध होतात.

ऋग्वेदांतील प्रमाण.

**ऋग्वेदांत** वाचेचे चार प्रकार सांगितलेले असून, त्यांपैकीं तीन हृदयान्तर्गत, अतएव गुप्त असल्यामुळें, ते प्रकाशमान नाहींत; आणि **तूर्या** नांवाचा चवथा प्रकार मात्र मनुष्यें बोलतात, अशा बद्दलचें वर्णन आहे.

**चत्वारिवाक् परिमिता पदानितानि**

**विदुर्ब्राह्मणा ये मनीषिणः ।**

गुहा त्रीणि निहिता नेङ्गयन्ति
तुरीयं वाचो मनुष्या वदन्ति ॥ ४५ ॥

( ऋ. अ २. अ ३. व २२. मं १. अ. २२. सू. १६४ ).

यावरून, ऋग्वेद कालीं ज्या संस्कृत भाषेचा उपयोग करीत असत, ती त्या वेळची व्यावहारिक भाषा होती, असें उघड दिसतें.

सदरहू दाखला वाचकांस पुरेसा वाटत नसल्यास, संस्कृत भाषेच्या व्यावहारिकत्वाबद्दल, भिन्न भिन्न काळां-तील निरनिराळे दाखले, मी यथावकाश सादर करितों.

प्रथमतः रामायणकालांतील दाखला देतों. कारण, वेद्कालानंतर रामायणकाल होय.

रामायणांतील प्रमाण.

लंकापुरींत गेल्यावर, सीतादेवीला कशाप्रकारें बोलावें, असें मनांत येऊन, हनुमान आपल्याशींच म्हणतो कीं, कोणत्या तरी निमित्तानें, मी त्या धैर्यशील रामाचा स्तुतिवाद गाण्यास प्रारंभ करीन; आणि नन्तर तिला उद्देशून संस्कृतभाषेंतच बोलेन; कारण, तसें केल्यानेंच रामाच्या ठिकाणीं तिचें मन सल्लग्न होऊन, तिला भीति वाटणार नाहीं.

राममक्लिष्टकर्माणं निमित्तैरनु कीर्तयन् ।
तस्माद्वक्ष्याम्यहं वाक्यं मनुष्यइवसंस्कृतम् ॥ ३ ३ ॥

**नैनामुद्वेजयिष्यामि तद्बुद्धिगतमानसाम् ॥ ३४ ॥**

( रामायण, सुन्दरकाण्ड. ३० )

ह्यावरून, **संस्कृत** भाषा त्यावेळीं प्रचारांत असल्याचें चांगलें व्यक्त होतें.

**अरण्यकांडां**तही, **इल्वल** नामक क्रूर राक्षसानें **ब्राह्मणा**चें रूप धारण करून, तो **संस्कृत** बोलावयास लागला; आणि नन्तर त्यानें ब्राह्मणास श्राद्धकर्म करण्यास बोलाविलें; अशाविषयींचें वर्णन आहे.

**धारयन् ब्राह्मणं रूपं इल्वलः संस्कृतं वदन् ।**
**आमन्त्रयति विप्रान्स श्राद्धमुद्दिश्यनिघृर्णः ॥ ५६ ॥**

( रामायण. अ. काण्ड. ११ ).

ह्यावरून देखील, त्यावेळीं **संस्कृत** भाषा चांगली व्यवहारांत असून, ती **ब्राह्मण** लोक तर सर्रास्त व हमखास बोलत असल्याचें उघड दिसतें.

असो. ह्यानंतरचें प्रमाण **निरुक्तां**तलें होय. **निरुक्ता**-

निरुक्तांतलें प्रमाण.

चा कर्ता सुप्रसिद्ध **यास्क** असून, हा फार पुरातन व शोधक वैय्याकरणी असल्याविषयीं सर्वांस महशूर आहे. हा **पाणिनी**च्याही अगोदर सुमारें शेंदोनशें वर्षें तरी उदयास आला असावा, असें वाटतें. कारण, त्याच्या व **पाणिनी**च्या व्याकरणपद्धतींत महदन्तर दृष्टिगोचर होत असून, इतका फरक पडण्याला निदान दोन शत-

कांचा छाटा असणें अवश्य आहे; आणि म्हणूनच त्याचा उदयकाळ इ. स. पूर्वी सुमारें ९०० वर्षे असल्याचें संभवनीय दिसतें.[1]

सदरहू **यास्क** ऋषि निपातांसंबंधीं विवेचन करतांना ठिकठिकाणीं असें म्हणतात कीं, ह्यापैकीं अमुकाचा उपयोग वेदांत ( **अन्वध्यायम्** ) अमुक तऱ्हेचा असून, त्याचा उपयोग नेहेमीं प्रचारांत असलेल्या **संस्कृत** भाषेंत ( **भाषायाम्** ) अन्य तऱ्हेनें करण्यांत येतो. उदाहरणार्थ, एके ठिकाणीं ऋषिमजकूर असें लिहितात कीं,

तेषामेते चत्वार उपमार्थे भवन्तीति ।
" इव " इति **भाषायामन्वध्यायंच**
" अग्निरिव " " इन्द्रइव " इति ।
" न " इति प्रतिषेधार्थीयो **भाषायाम्**
उभय **मन्वध्यायम्** ।

(निरुक्त १. ४.)

" इव " शब्दचा अर्थ **वैदिक** भाषेंत, किंवा **प्रचारांत** असलेल्या **संस्कृत** भाषेंत, उपमार्थीच होतो. जसें

1 **पाणिनीचा** काल इ. स. पूर्वी सुमारें ७०० वर्षे असल्याविषयीं डा. **भांडारकर** यांचें मत आहे. भा. साम्राज्य. पू. पु. २ रें पहा. पंडित सत्यव्रत सामश्रमीच्या मतें ह्याचा काळ इ. स. पू. १२०० वर्षे असावा. ( नंदर्गीकरकृत रघुवंशावरील टीका पहा. पा. १८७.)

इंद्रासारखा, अग्नीसारखा. परंतु, तसें "न" ह्या निपाताचें नाहीं. कारण, व्यावहारिक **संस्कृत** भाषेंत, त्याचा अर्थ फक्त नकारार्थीच होत असून, **वैदिक** भाषेंत मात्र, त्याचा नकारार्थी आणि उपमार्थी, असे दोन्ही अर्थ होतात.

ह्यावरून, वाचकांच्या लक्षांत इतकें सहजीं येईल कीं, '**भाषायाम्**" शब्दानें व्यवहारांत असलेली **संस्कृत** भाषाच घ्यावयाची आहे; व त्यावरून, **यास्क** ऋषींच्या वेळीं देखील **संस्कृत** भाषा सर्वत्र प्रचारांत होती, हें निःसंशय ठरतें.

पाणिनीच्या अष्टाध्यायींतील प्रमाण.

**पाणिनीनें** देखील त्याच्यावेळीं प्रचारांत असलेल्या **संस्कृत** भाषेला फक्त "**भाषा**[1]" अशीच संज्ञा दिली असून, **वैदिक** भाषेंतील शब्दांचा उपयोग दाखविण्याकरतां, **छन्दस्**[2], **मंत्र**[3], **निगम**[4], **ऋषि**[5], **ऋक्**[6], या शब्दांचा उपयोग केला आहे. उदाहरणार्थ,

---

१ सूत्र. ६, १, ८१; ६, ३, २०; ८, २, ९८; ७, २, ८८; ३, २, १०८.

२ सूत्र. १, २, ३६.

३ सूत्र. २, ४, ८०; ६, १, १५१; ६, १, २१०; ६, ३, १३१.

४ सूत्र. ६, ३, ११३; ६, ४, ९;

५ सूत्र. ४, ४; ९६; ६, ३, १३०.

६ सूत्र. ६, ३, १३३.

स्थेचा भाषायाम् ।
विभाषा छन्दसि ।
ऋषौ । ऋचि । इत्यादि.

ह्यावरून, **पाणिनीच्या** वेळीं सुद्धां, **संस्कृत** भाषा व्यावहारिकच असल्याचें चांगलें व्यक्त होतें.

**पाणिनीच्या** अष्टाध्यायीवर **पतंजलीची** सर्वमान्य टीका असून, ती **महाभाष्य** नांवानें सुप्रसिद्ध आहे. ह्यांत, कांहीं ठिकाणीं मूळ **संस्कृत** शब्दाचा अपभ्रंश झाल्यामुळें, त्याचीं कसकशीं भिन्न रूपें होतात हें दाखवून, तो असें लिहितो कीं, शुद्धशब्द थोडे असून, अपभ्रंशाच्यायोगानें अशुद्ध शब्द पुष्कळ बनतात. उदाहरणार्थ, "**गौः**" शब्द शुद्ध होय. परंतु, त्या एकाच शब्दाचे "**गावी,**" "**गोणी,**" "**गोता,**" "**गोपोतलिका,**" इत्यादि अनेक अपभ्रंश झाले आहेत.

महाभाष्यांतील प्रमाण.

भूयांसोऽपशब्दा अल्पीयांसः शब्दाः ।
एकैकस्य हि शब्दस्य बहवोऽपभ्रंशाः ।
तद्यथा **गौरित्यस्य** शब्दस्य **गावी, गोणी,**
**गोता, गोपोतलिका,** इत्येवमादयो बहवोऽपभ्रंशाः ।

ह्यावरून असें उघड दिसतें कीं, **संस्कृत** भाषेंतील शब्द, शुद्ध आणि व्यावहारिक असल्याविषयीं, तत्कालीन

समजूत असून, त्या व्यतिरिक्त अन्य शब्द अपभ्रष्ट वर्गांतच दाखल होत, यांत संशय नाहीं.

त्याबंधानें सांप्रतकाळचें प्रत्यक्ष प्रमाण,

आतां, ही **गीर्वाण** पुराणभाषा, फार प्राचीनकाळीं देखील व्यवहारिक असल्याविषयीं सिद्ध करण्यासाठीं, हा येवढामोठा **द्राविडी** प्राणायाम करण्याचीही कांहींच अवश्यकता नाहीं. कारण, **काश्मीर, बनारस, नालंद,** आणि **नडिया,** इत्यादि प्रसिद्ध विद्यापिठांच्या ठिकाणीं, **संस्कृत** हीच पंडितजनांची सर्व साधारण प्रचारांतली भाषा असल्याचें दिसून येतें; व ह्याच भाषेंत ते अस्खलित रीतीनें वादविवादही करितात. परंतु, याहींपेक्षां, **सूर्य** व **जयद्रथा**सारिखें दुसरें एखादें प्रत्यक्ष आणि बलवत्तर प्रमाण पाहिजे असल्यास, तें सुद्धां आपल्या सान्निधच उपलब्ध आहे. सबब, त्याकडे क्षणभर वळूं.

**व नवीन झालेल्या खानेसुमारींतील दाखला.**

इ. स. १८९१ सालच्या[१] खानेसुमारींत, तीनशें आठ इसमांनीं आपली स्वभाषा **संस्कृत** असल्याविषयीं लिहून दिलें

---

१ Baine's Census Report for 1891 says, "In bringing to a close this review of the Aryan tongues of India, the fact should be mentioned that 308 persons returned the tongue habitually spoken in their parent's household as Sanskait." ( P. 144. )

आहे. त्यावरून, आज दहापंधरा हजार वर्षांची ही अति पुराण भाषा, व्यवहारांत आणि प्रचारांत, अजून देखील आपलें डोकें वरकरूनच आहे, असें कोणच्याही लक्ष्यांत आल्यावांचून राहणार नाहीं. आतां, ही स्वभाषा म्हणून बोलणारांची संख्या फारच थोडी आहे खरी. तथापि, तेवढ्या वरून देखील, प्रस्तुत शंकेचें निवारण सहजीं होण्यासारखें आहे.

---

# भाग ५४ वा.

## संस्कृत भाषेचें स्थित्यन्तर व तिचा अपभ्रंश.

संस्कृतेतर दुसऱ्या आर्यभाषा, व त्यांतील शब्दांचा अपभ्रंश.

मागील भागांत, आमची परमपूज्य आणि अति पवित्र **आर्यभाषा** जी "**संस्कृत**," ती व्यावहारिक असल्याबद्दल केवळ अवश्य तितकें सामान्य विवेचन केलें. सबब, आतां, **आर्यभाषे**पासून उत्पन्न झालेल्या दुसऱ्या शाखांकडे वळूं, व त्यांत **संस्कृत** शब्दांचें कसें संमिश्रण होत जाऊन, कशा प्रकारचा अपभ्रंश झाला आहे, आणि कोणत्या तऱ्हेनें रूपान्तर बनलें आहे, याविषयीं यथावकाश विचार करूं.

त्याचीं कारणें.

आम्हां **आर्यहिंदूं**च्या अनेक शाखा **भरतखंडा**बाहेर, फार दूरदूर व खंडान्तरीं, गेल्याकारणानें, **मायभाषा** जी **संस्कृत** तिच्याशीं त्यांचा संबंध दिवसानुदिवस तुटत चालला. त्यामुळें, कित्येक शब्दांत सहजीं अपभ्रंश होऊन, कांहींत जमीन अस्मानाचें अन्तर पडत गेलें; आणि राहिल्यासा-

हिल्यांत तर सर्व प्रकारचाच लोप होऊन, त्या ऐवजीं अगदीं नूतन शब्द बनले[1].

**पारसीकां**सारखी जी शाखा आमच्या सान्निध राहिली, तिच्यांत तितक्या मानानें कमी अन्तर पडलें, व त्यायोगानें शब्दसाम्यता बऱ्याच अंशानें राहिली.

**पाश्चात्य** शाखांपेक्षां, **पौरस्त्य** शाखा विशेष निकटवर्ती असल्यानें, ह्यांच्यांत, **पाश्चात्य** शाखांतील शब्दांपेक्षां, विशेष साम्य दृग्गोचर होतें; आणि अपभ्रंशही बराच कमी झालेला दृष्टीस पडतो[2].

**ऋग्वेदां**तील **संस्कृतांत** व तदनन्तरच्या **संस्कृतांत** ही पुष्कळ भेद दृष्टोत्पत्तीस येतो. इतकेंच नव्हें तर, **वैदिक** काळांतील ज्या कित्येक धातू फक्त त्या वेळीं मात्र प्रचारांत होत्या, त्या पुढें पुढें अगदीं व्यवहारातीत होऊन, अत्यलंकृत व परिपक्वतेस आलेल्या **लौकिक**[3] **संस्कृतांत** तर त्यांचा मागमूस देखील राहिला नाहीं.

ह्यासंबंधाचा तपशिलवार दाखला पूर्वीच दिला आहे. सबब, तद्विषयक आणखी येथें जास्त विवेचन करण्याचें कारण नाहीं.

---

१ मागें पान ५३ ते ५६, व ६६ ते ७२ पहा.

२ मागें पान ५३ ते ५६, व ६६ ते ७० पहा.

३ Classical Sanskrit.

४ मागें पान ७० वें पहा.

असो. आमची ही पुराण **संस्कृत** भाषा जावत्काल-पर्यंत प्रचारांत होती, तावत्काल पर्यंत हरएक व्यवहार ह्याच भाषेंत होत असे. लहान व थोर, कुलीन व नीच, श्रीमंत व गरीब, राव आणि रंक, विद्वान व मूढ, सुशिक्षित व आशिक्षित, इत्यादि **संस्कृत** भाषाच बोलत; आणि सर्व प्रकारचें शास्त्रीय विवेचन व ग्रंथलेखन ह्याच भाषेंत होई. मात्र, भेद ह्मणून इतकाच कीं, ज्या ज्या वेळीं असमंजस लोकांतच हिचा उपयोग करण्यांत येई, त्या त्या वेळीं, शब्दकाठिण्यामुळें ह्मणा, अगर अर्थदुर्बोधत्वामुळें ह्मणा, ते मुळच्या शब्दांत पुष्कळ प्रकारें फेरफार करूनच बोलत. इतकेंच नव्हें तर, कित्येक शब्दांचें रुपान्तर करूनच ते त्यांचा उपयोग करीत.

प्राकृत भाषा व तिची व्याख्या.

याप्रमाणें, अनेक शब्दांत नानाप्रकारचे फेरफार होऊन, **प्राकृत** उर्फ़ीस, म्हणजे प्रजाजनाच्या सामान्य शब्दांस, शनैः शनैः भाषेचें स्वरूप सहजीं येत चाललें. तदनंतर, कालान्तरानें, त्या आपोआपच प्रचारांत येऊं लागल्या; आणि त्यामुळें, त्यांस **प्राकृत** ह्मणण्याचा परिपाठ पडला.

असो. **प्राकृतभाषेची** व्याख्या **मागधी** व्याकरणांत दिलेली असून, हें व्याकरण **हेमचन्द्र** नामक विद्वान आणि शोधक पंडितानें केलें आहे. तो म्हणतो,

**प्रकृतिः संस्कृतं, तत्रभवं, तत आगतं वा प्राकृतं ॥**

ह्यावरून एकंदर **प्राकृत**भाषा **संस्कृतोद्भव** असल्याचें सहजीं ध्यानांत येईल.

आतां, **संस्कृत** भाषा व्याहारिक असूनही, तिच्या कित्येक शब्दांत कालगतीनें कसा अपभ्रंश होत गेला, व त्याकारणानें एकंदर **प्राकृत** भाषा कशा उदयास आल्या, याविषयींचें कुतूहल जागृत होणें अगदीं साहजीक आहे. सबब, तत्संबंधीं शंकानिवारणार्थ, याठिकाणीं थोडाबहुत तरी खुलासा करणें अत्यवश्य दिसतें.

ह्या बाबतींत सामान्य दिग्दर्शन झाल्यानें, अवश्य तो कार्यभाग होईल असें समजून; सांप्रतची **मराठी भाषाच** प्रथमतः घेतों. ही भाषा प्रस्तुतकाळीं, अखिल **महाराष्ट्र देशांत** नेहमींच्या प्रचारांतली आहे. तिचा खरोखरच आम्हीं सर्वत्र उपयोग करितों. घरीं, दारीं, आणि मुलांबाळांबरोबर देखील, आम्हीं तीच बोलतों. हरएक प्रकारचा व्यवहार आम्हीं तिच्यांतच चालवितों. आह्मीं आपले यच्चावत विचार तिच्यांतच प्रकट करितों. नानाप्रकारचे ग्रंथ सुद्धां आह्मीं हिच्यांतच लिहितों. तऱ्हेतऱ्हेचीं धर्मपुस्तकें लिहितांना आम्हीं हीच भाषा सदैव वापरतों. अनेक तऱ्हेचें शास्त्रीय विवेचनही ह्याच भाषेच्या द्वारें केलें जातें. राजकीय सल्लामसलत ह्याच भाषेंत होते. लोकशिक्षणही

मराठी भाषा व तिच्यांतलि शब्दांचें रूपांतर.

ह्याच भाषेंत चालतें. आणि अडाणी अगर खालच्या प्रतीच्या लोकांबरोबरचा आमचा नेहमींचा व्यवहारही याच भाषेंत होतो. तथापि, हल्लीं देखील, जी **मराठी** भाषा उच्चप्रतीचे लोक बोलतात, अगर वरच्या दरजाचे लोक वापरतात, तींत, आणि जी भाषा हलक्या प्रतीच्या व खालच्या दरजाच्या लोकांत प्रचारांत आहे, तींत, पुष्कळच अंतर आहे. किंबहुना, जमीन अस्मानाचें अंतर आहे, असेंही म्हणण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं.

त्याचें कारण.

आतां, हें अन्तर पडण्याचें कारण मुख्यत्वेंकरून असें दिसतें कीं, **संस्कृत** भाषेंतील कित्येक कठिण शब्द अशिक्षित लोकांस किंवा खालच्या प्रतीच्या वर्गास बोलण्यास जड जातात, अथवा उच्चार करण्यास कठिण वाटतात. त्यामुळें, त्यांच्या असंस्कृत जिव्हेला जो उच्चार स्वल्पसा भासतो, तोच करण्याचा प्रघात पडून, तेच त्या भाषेंतील सामान्यतः नूतन शब्द बनतात. उदाहरणार्थ, अशिक्षित **शूद्र** किंवा **कुणबी** लोकांस "**ब्राह्मण**" शब्द सहसा उच्चारता येत नाहीं. म्हणून, ते त्या शब्दांतल्या 'र'काराचा आणि 'ह'काराचा लोप करून, बाकी राहिलेल्या वर्णांचा उच्चार करितात, व "**बामण**" असें बोलतात. त्याचप्रमाणें, "**बृहस्पतिवार**" या शब्दाच्या ऐवजीं, ते "**बिस्तरवार**" असें म्हणतात; "**श्राद्ध**"

शब्दाच्या बद्दल ते "**सराध**" असा उच्चार करितात. "**शास्त्र**" शब्दाऐवजीं "**शास्तर**" असें म्हणतात; "**कृष्ण**" शब्दाच्या ठिकाणीं "**कुष्णा**" असें बोलतात; आणि "**द्रौपदी**"ला "**दुरपदी**" म्हणून हांक मारितात.

कित्येक शब्दांत '**व**' काराच्या ऐवजीं '**इ**' काराचा आदेश करून, नंतर तो शब्द ते उपयोगांत आणितात. उदाहरणार्थ, '**विठोबा,**' '**विठ्ठल,**' '**विचार,**' '**विडा,**' इत्यादि शब्दांच्या ऐवजीं '**इठोबा,**' '**इठ्ठल,**' '**इचार,**' '**इडा,**' असा ते उच्चार करितात. कांहीं कांहीं ठिकाणीं तर शब्दांतल्या अनुस्वारास ते अजिबात फांटाच देतात; व कित्येक प्रसंगीं मूर्धन्य '**ण**' च्या ऐवजीं दन्त्य '**न**' वापरतात. उदाहरणार्थ, "**भिंती**" च्या ऐवजीं ते "**भीत**" म्हणतात; "**चिंचे**" च्या बद्दला ते "**चीच**" असा शब्द वापरतात; आणि "**पंचवीस**" च्या ठिकाणीं "**पचीस**" असाच आदेश करितात. तसेंच, "**गणेश,**" "**नारायण,**" "**चिमणी,**" "**कुटाणा,**" इत्यादि शब्दां ऐवजीं "**गनेश,**" "**नारायन,**" "**चिमनी,**" "**कुटाना,**" असें बोलतात.

कांहीं कांहीं ठिकाणीं, याहून भिन्न आणि दुसऱ्या प्रकारचेंच रूपान्तर होतें. उदाहरणार्थ, "**एक**" असें म्हणण्याऐवजीं ते "**योक**" या शब्दाचा उपयोग करितात.

कित्येक शब्दांत तर निव्वळ वर्णलोपच झाल्यासारखें दिसतें. उदाहरणार्थ, '**मयूरा**'ला '**मोर**' म्हणतात. '**सुवर्णा**'ला '**सोनें**' बोलतात. '**कर्णा**'च्या बद्दल '**कान**' असा शब्द वापरतात. आणि '**चन्द्रा**'च्या ऐवजीं '**चान्द**' या शब्दाचा उपयोग करितात.

कांहीं **संस्कृत** शब्दांत गुणादेश होऊन, नंतर तो शब्द **मराठी** ( प्राकृत ) भाषेंत सामील झाल्याचें दृष्टिगोचर होतें. उदाहरणार्थ "**तुंडा**"चें "**तोंड**" झालें; व "**शुंडा**"ची "**सोंड**" बनली.

याप्रमाणें, **संस्कृता**पासून उद्भवलेल्या **मराठी** भाषेंत जें शब्दांचें रूपान्तर झालें, त्याचें प्रस्तुत विषयापुरतें सामान्य दिग्दर्शन केलें. सबब, आतां क्षणभर दुसऱ्या भाषांकडे वळूं, व त्यांत **संस्कृत** शब्दांचा कसकसा अपभ्रंश होत गेला आहे, तें थोडक्यांत पाहूं.

गुजराथी भाषा.

**गुजराथी** भाषा देखील **मराठी**प्रमाणेंच केवळ **संस्कृता**पासून उद्भवली आहे; आणि तींतही अनेक **संस्कृत** शब्दांचें विलक्षण रूपान्तर झालेलें दिसतें. उदाहरणार्थ, "**नारायण**" शब्दाचा "**नारण,**" व क्वचित् ठिकाणीं "**नाण,**" असा सुद्धां अपभ्रंश झाल्याचें दिसतें. आणि कित्येक-प्रसंगीं, त्याच शब्दाच्या ऐवजीं "**नायणा**" असाही उपयोग केल्याचें दृष्टिगोचर होतें. फार तर काय सांगावें

पण, नारणजी, नाणजी, व नायणा, इत्यादि नांवानीं हाक मारण्याचा आणि लिहिण्याचा गुजराथी लोकांत अजूनही परिपाठ असून, तशी चाल सर्वत्र हमखास सुरू आहे.

अशा प्रकारें, दुसऱ्याही कित्येक शब्दांचा अपभ्रंश झाल्यासारिखें दिसतें, व रूपान्तर झालेलें आढळतें. उदारणार्थ, "अक्षि"[1] या शब्दाचा गुजराथी भाषेंत "आंख" असा अपभ्रंश झाला. "पादा" ला "पग"[2] म्हणूं लागले. "हस्ता" च्या ठिकाणीं "हाथ"[3] असा आदेश करण्याचा परिपाठ पडला. "अंगुलि" शब्दाची कालान्तरानें "आंगळी"[4] झाली. आणि "मुख" शब्दाचें "मोढूं"[5] बनलें.

त्यांतील शब्दांचें रूपांतर.

त्याचप्रमाणें, "मनुष्या" चे "माणस" झालें. "श्वशुर" शब्दाचा "ससरा" असा अपभ्रंश झाला. "भ्रातृ" शब्दांतला रकार जाऊन, त्याचें "भाई" असें रूपान्तर बनलें. "जामातृ" चें "जमाइ" असें रूप करण्यांत आलें. "कुमारी" चें "कुंवारी" झालें, आणि "भाजन" शब्दा ऐवजीं "वासण"

१ अक्षि = डोळा. हा शब्द संस्कृतांत नपूंसकलिंगी आहे. परंतु, गुजराथी भाषेंत तो स्त्रीलिंगांत वापरतात. उदाहरणार्थ, "आंख सारी छे."

२ पाय. ३ हात. ४ बोट. ५ तोंड.

असा आदेश करण्यांत आला. अशा प्रकारें, अनेक शब्दांचीं नाना प्रकारचीं रूपान्तरें देतां येतील. परंतु, स्थलसंकोचास्तव एतद्विषयक जास्त ऊपापोह करतां येत नाहीं. मात्र, प्रस्तुत विषयाच्या समर्थनार्थ जेवढें दिग्दर्शन करणें अवश्य वाटलें, तितकेंच केलें आहे.

हिन्दी भाषा.

असो. **मराठी** आणि **गुजराथी** भाषेप्रमाणेंच **हिन्दी** किंवा **हिंदुस्थानी** भाषा देखील **संस्कृतोद्भवच** आहे. सबब, आतां तिजकडे जराशी आपण दृष्टी फेंकूं, आणि तत्संबंधीं थोडीशी हकीगत देऊं.

तिच्यांतलें संस्कृत शब्दांचें झालेलें रूपांतर.

**मराठी** आणि **गुजराथी** भाषेपेक्षां, **हिंदीचें संस्कृताशीं** अगदीं निकट साम्य दिसतें. इतकेंच नव्हे तर, शब्दांचें रूपान्तरही त्या मानानें तींत कमी झालेलें भासतें. उदाहरणार्थ, "**कथयति**" शब्दाचा "**केहेताहै,**" असा ह्या भाषेंत अपभ्रंश झाला. "**शर्करा**" शब्दाला "**शक्कर**" असें म्हणण्याचा परिपाठ पडला. "**तनु**" शब्दाचें "**तन**" असेंच रूप बनलें. "**घृता**"चें "**घी**" झालें. "**सूर्या**"ला "**सुरज**" म्हणूं लागलें. "**रमति**" शब्दाचें "**रमताहै**" असेंच रूप राहिलें. "**श्यालक**"चें "**साला**" असें रूप झालें. आणि **गृह, मुख, पाद**, व **पल**, इत्यादि शब्दांऐवजीं **घर, मुखडा, पांव**, आणि **पलख**, असा अपभ्रंश होत गेला.

---

# भाग ५५ वा.

## प्राकृत आणि इतर व्याहारिक भाषां-विषयीं सामान्य विचार.

प्राकृत भाषेचें विवेचन

प्राकृत भाषा कशी उद्भवली, व ताद्विषयक विद्वान लोकांचें काय मत आहे, याबद्दल मागील भागांत थोडेसें दिग्दर्शन झालें. सबब, प्रस्तुत भागांत, ह्या **भरतखंडांत** प्रचारांत असलेल्या **प्राकृत** आणि इतर व्यावहारिक भाषां-संबंधीं दुसरी अवश्य ती माहिती देऊन, नन्तर **अनार्य** भाषेकडे वळूं

प्राकृतभाषा कशा उद्भ-वल्या आहेत, याविषयीं भारतीय पंडितांचें मत.

आतां, एतद्विषयक आमच्या प्राकालीन व **आर्य** पंडि-तांचें आणि **कविपुंगवांचें** काय मत आहे, त्याचेंही येथें थोडेसें दिग्दर्शन केलें पाहिजे. ते असें समजतात कीं, **संस्कृत** ही नामांकित **दैवीवाक्** असून, तिच्यापासूनच सांप्रतच्या **प्राकृत** भाषा उद्भवल्या आ-हेत. अशा प्रकारें उद्भवलेल्या **प्राकृत** भाषांचे ते मुख्य-त्वेंकरून तीन वर्ग करतात. १ तद्भव. २ तत्सम.

त्यांचे वर्ग. आणि ३ देशी. संस्कृतापासून उत्पन्न झालेले शब्द जिच्यांत आढळतात, ती तद्भव होय. संस्कृतासारखे शब्द जिच्यांत असतात, ती तत्सम समजावयाची. आणि ज्या त्या देशांतील प्रचारांतले शब्द जिच्यांत दिसून येतात, ती देशी म्हणावयाची.

तद्विषयक आधार. एतद्विषयक, काव्यादर्शांत[1] खालीं लिहिल्याप्रमाणें आधार आढळून येतो.

**संस्कृतं नाम दैवी वागन्वाख्यातामहर्षिभिः ॥**
**तद्भवस्तत्समोदेशीत्यनेकः प्राकृतक्रमः ॥ ३३ ॥**
( प्रथमः परिच्छेदः ).

आतां, १ तद्भव, २ तत्सम, आणि ३ देशी, इत्यादि प्रकारांनीं प्राकृत भाषांचें जें सदरीं वर्गीकरण झालें, तें ध्यानांत येण्यासाठीं, त्या प्रत्येकाचें उदाहरण देऊन थोडेंसें दिग्दर्शन करतों.

तद्भव, तत्सम, आणि देशी, यांचीं उदाहरणें. प्रत्यक्ष संस्कृतापासूनच उद्भवलेली अशी प्राकृतांपैकीं जी एक महाराष्ट्र भाषा, तींत संस्कृतोद्भव शब्दांचा पुष्कळच भरणा असल्याचें दिसतें. सबब, हिचा तद्भव

१ हा शास्त्रीय ग्रंथ सुप्रसिद्ध दंडी कवीनें रचलेला असून, तो इ. स. सहाव्या शतकांत प्रसिद्धीस आला होता. भारतीय साम्राज्य, पूर्वार्ध. पु. २. भा. १४. पान २२६।२२७ पहा.

वर्गांत समावेश करण्यास कांहींएक प्रत्यवाय नाहीं. शौरसेनीसारख्या भाषा तत्समवर्गांत मोडतात. कारण, त्या संस्कृतोद्भव नसून, केवळ संस्कृततुल्य मात्र आहेत. शौरसेनी म्हणजे मथुरा नजीकच्या प्रांतांतील भाषा असून, ती त्या प्रांतांत विशेष प्रचारांत असल्याविषयीं सर्वांस महशूर आहे. आतां, बाकी राहिलेली जी देशी-भाषा, तिच्यांत ज्या त्या देशांतल्या व्यावहारिक शब्दांचें विशेष प्राचुर्य असल्यामुळें, तिचा तिसऱ्या वर्गांत समावेश होतो; व तिला सदरहू कारणानेंच देशी असें नामधेय पडलें आहे.

कित्येकांच्या मतें प्राकृत भाषेचे मुख्य दोनवर्ग.

असो. सदरहू प्रमाणें, प्राकृत भाषेचे जरी तीन वर्ग केलेले दृष्टीस पडतात, तथापि, कित्येक आर्यकवी आणि आर्यभाषाभिज्ञ हे तिचे फक्त दोनच वर्ग करून, तिला १ आर्षोत्थ व २ आर्षतुल्य, म्हणजे संस्कृतापासून झालेली आणि संस्कृतासारखी, अशी संज्ञा देतात.

प्राकृत भाषेचें लक्षण.

आतां, प्राकृत म्हणजे काय याविषयींचाही येथेंच थोडासा उल्लेख करणें अगदीं अगत्याचें आहे. कित्येक संस्कृतभाषाकोविद आणि प्राकृतज्ञ, हे प्राकृताची खालीं लिहिल्याप्रमाणें व्याख्या देतात.

**संस्कृतरूपायाःप्रकृतेरुत्पन्नत्वात् प्राकृतम् ।**

म्हणजे जी आरंभापासूनच **संस्कृतोद्भव** आहे, ती **प्राकृत** होय.

प्राकृताची हेमचन्द्रकृत व्याख्या.

सुविश्रुत वैय्याकरणी **हेमचन्द्र**, ज्यानें **मागधी** भाषेचें उत्तम व्याकरण लिहिलेलें आहे, हा देखील मागील भागांत दर्शविल्याप्रमाणें, **प्राकृत** भाषेविषयीं असेंच लिहितो. ह्या भाषेची व्याख्या देतांना तो असें म्हणतो कीं,

**प्रकृतिःसंस्कृतं ।**

**तत्र भवं ।**

**तत आगतं वा प्राकृतम् ।**

ह्मणजे जिचें **मूळ** अगर आगम **संस्कृत** आहे; अथवा जी **संस्कृतोद्भव** आहे; किंवा जी तिच्या पासूनच झाली आहे; ती **प्राकृत** समजावयाची.

प्राकृतभाषेचें मुख्य प्रकार.

**प्राकृत** भाषेचे खालीं लिहिल्याप्रमाणें एकंदर अकरा प्रकार असल्याचें दिसतें.

१ **शौरसेनी**. २ **गौडी**. ३ **लाटी**. ४ **पैशाची**. ५ **आवन्ती**. ६ **मागधी**. ७ **अर्धमागधी**. ८ **प्राची**. ९ **महाराष्ट्री**. १० **द्राविडी**. आणि ११ **बाल्हीकी**.

अर्थात्, हे मुख्य भेद असून, ह्यांचे जे कालान्तरानें

अनेक प्रकार झाले, त्याविषयींची सविस्तर हकीकत यापुढें दिलेली आहे.

प्राकृत भाषांच्या सांप्रतच्या स्वरूपाचें सिंहावलोकन.

असो. आर्यभाषेपासूनच भरतखंडांतील ह्या सांप्रतच्या प्राकृत भाषा उद्भवल्या आहेत. सबब, त्यांची ही जी प्रस्तुतची स्थिति दिसत आहे, ती प्राप्त होण्याला त्यांजवर कोणकोणते, कशा कशा प्रकारचे, आणि केव्हां केव्हां संस्कार घडून आले, त्याबद्दलचा आतां थोडासा विचार करूं.

त्यांजवर आर्यभाषेचे संस्कार.

आमच्या प्राकृत भाषांवर प्रथमतः आर्यभाषेचे, म्हणजे अर्थात् संस्कृत भाषेचे अनेक परिणाम घडून आल्याचें दृष्टिगोचर होतें. कारण, ह्यांत, सदरहू भाषेंतील शब्दांची अगदीं रेलचेल होऊन, त्यामुळें ही बरीच अलंकृत झाली, आणि त्यायोगानें पारिभाषिक शब्दांचीही सहजीच भर पडत गेली. इतकेंच नव्हे तर, आर्यांची जी एकंदर विचारसरणी व वाक्सौन्दर्य सर्वत्र दृग्गोचर होतें, त्यांची देखील पूर्णछाप त्यांजवर बसली.

अन्य भाषांचे संस्कार.

आतां, प्राकृत भाषांवर ज्याप्रमाणें संस्कृत भाषेचें प्राबल्य दिसून येतें, त्याचप्रमाणें अन्य भाषांचाही त्यांजवर स्वयमेव संस्कार झालेला दृष्टिगोचर होतो. कारण, आर्य

लोकांचें इतरांशीं दिवसानुदिवस जास्त संघट्टण होत गेलें, आणि त्यामुळें **प्राकृत** भाषांत अन्य भाषांचें बरेंच संमिश्रण झालें.

त्यांजवर झालेला बौद्धधर्माचा परिणाम.

पुढें कालान्तरानें, इ. स. पूर्वींच्या सातव्या शतकांत, ह्या **भरतखंडांत** एक विलक्षण धर्मक्रान्ति होऊन, तिनें हा सर्व देश हालवून टाकिला, व दाही दिशा दणाणून सोडल्या. ह्या धर्मक्रान्तीचें मूलकारण **गौतमबुद्ध** होय. हा इ. स. पूर्वीं ६२२ सालीं जन्मला, आणि पुढें मोठा झाल्यावर, त्यानें **बौद्धधर्म** नांवाचा एक निराळाच पंथ काढून, त्याचा सर्वत्र प्रसार व्हावा एतदर्थ, भगीरथ प्रयत्न केला.

मागधी भाषेचा उर्जितकाळ.

तदनंतर, थोडक्याच काळांत, हा धर्म **आशियाखंडांतील** बहुतेक देशांत हं हं म्हणतां पसरला, आणि पुढें पुढें तर, त्याला चांगला राजाश्रयही मिळाला. त्यामुळें, सर्व लोकांना एकसारखी समजणारी जी **प्राकृत**भाषा, तिच्यांतच सर्वांस धर्मोपदेश करण्याविषयीं राजाज्ञा होऊन, त्यावेळेस प्रचारांत असलेल्या **मागधी** भाषेचा एकदम फैलाव झाला, आणि हीच पवित्र भाषा बनून, ती **पालीच्या** पदवीप्रत पोहोंचली.

---

१ ह्याबद्दलचें सविस्तर विवेचन, उत्तरार्धांतील सातव्या पुस्तकाच्या एकेच्याळीसाव्या भागांत, **बौद्धधर्मांत**, केलेलें आहे.

कालान्तरानें हा राजाश्रय एकसारखा वाढत चालला, व अशोकाच्या कारकीर्दींत तर त्याचा कळसच झाला. त्याकारणानें, मागधी भाषेला विलक्षण प्रोत्साहन मिळून, तिचा बोलबाला अधिकाधिकच वाढत गेला. आणि धर्मसंस्थेंत अगर विद्यापीठांत, सरकारांत अथवा दरबारांत, पंडितसमाजांत किंवा लोकसमुदायांत, घरीं अथवा दारीं, या भाषेचाच विशेष प्रसार झाला.

अशोकाची कारकीर्द.

याप्रमाणें, देशांतल्या देशांत, म्हणजे फक्त भरतखंडांतच, आमच्या प्राकृत भाषांचा उर्जितकाळ येण्याला, धर्मक्रान्तीची ही एक उत्कृष्टच संधी मिळाली; व त्यामुळें, त्या एकसारख्या फोंफावत चालल्या.

प्राकृत भाषावर देशांतले संस्कार.

पुढें, भरतखंडांत द्वीपान्तरीचें प्राबल्य वाढून, त्याचाही थोडा बहुत संस्कार घडण्याला, एक महत्वाचें आणि विशेष ध्यानांत ठेवण्यासारखें कारण झालें. सबब, त्याचा सुद्धां येथें किंचित् उल्लेख करणें अत्यवश्य आहे.

अन्य देशांतले संस्कार.

इ. स. पूर्वीं ३२७ व्या वर्षीं, शिकंदर बादशहानें हिंदुस्थानावर स्वारी केली. त्या वेळीं, त्याच्या बरोबर ग्रीस आणि मासिडोनिया देशांतले नामांकित विद्वान होते. त्यांनीं

यावानिक व्यवहाराचा गंध.

आमच्या आर्य हिंदूंचें ज्ञानभांडार पाहिल्यावर, त्यांजला विलक्षण जिज्ञासा प्राप्त होऊन, त्यांचें कुतूहल एकदम जागृत झालें; आणि आमच्या ग्रंथोदधींत यथेष्ट पोहोण्याची इच्छा त्यांनीं योग्य मार्गानें प्रदर्शित केली.

तेंव्हां, अशा प्रकारची ग्रीक लोकांकडून प्रार्थना होऊन मागणी झाल्यावर, आर्यहिंदूंनीं त्यांची विनंति तावडतोब मान्य केली, व त्यामुळें परस्परांत पुष्कळच दळणवळण सुरू झालें. शेवटीं, आमचें ज्ञानभांडार व शास्त्रोदधि, कलासमुच्चय व नीतिनैपुण्य, इत्यादि अवलोकन केल्यावर, ग्रीक लोकांचा दर्प आपोआप मावळला; आणि अखिल जगांत आपणच कायते शहाणे, म्हणून जी त्यांस वृथा घमेंडी होती, ती सहजीं आजिबात नाहींशी झाली. त्याकारणानें, ते आमच्याशीं विशेष सलोख्यानें वागूं लागले, व एकंदर व्यवहारही ज्यास्त वाढत चालला. त्यानंतर, ग्रीक लोकांचा राजा जो सेल्युकस् यानें कित्येक राजकीय कारणें मनांत आणून, आपली मुलगी चन्द्रगुप्ताला पाणिग्रहणार्थ दिली; आणि तेंव्हांपासून, ग्रीक बंधु आमचे व्याहीच बनले.

तक्षकांचें प्राबल्य.

तदनंतर, कांहीं कालानें, तक्षकांच्या (सिथियन् लोकांच्या) झुंडीच्या झुंडी हिंदुस्थानांत येऊन, त्यांनीं अफगाणिस्थान, काबूल, वायव्य प्रांत, व पंजाब, इत्यादि

ठिकाणें अंशतः व थोडा वेळपर्यंत व्यापून टाकिलीं. त्यामुळें, त्यांचाही थोडा बहुत संस्कार आमच्या प्राकृत भाषांवर सहजींच होऊन, त्यांचें शनैः शनैः रूपान्तर होत चाललें.

इस्लामशाहीचा परिणाम.

परंतु, इतक्यानेंच सर्व बाजार आटोपला नाहीं. कारण, ग्रीक आणि तक्षकांनंतर, आरब, मुसलमान, व मोंगल, यांनीं सुद्धां हिंदुस्थानावर अनेक स्वाऱ्या केल्या; आणि अखेरीस ते येथें चिरस्थायी देखील झाले. येवढेंच नव्हे तर, त्यांच्या आगमनानें आमच्या देशावर फारच महत्वाचे परिणाम घडून आले. राजकीय दृष्टीनें पाहिलें तर, त्यांच्या स्वाऱ्या आम्हांला सर्व प्रकारेंच अनिष्टकारक झाल्या. फार तर काय सांगावें पण, ह्या इस्लाम प्रभुत्वाला श्री शिवाजी छत्रपतीनें हळूं हळूं आळा घालून जर कां वेळींच विरजण लाविलें नसतें तर, हिंदुशाही बुडून आमची अगदीं राखरांगोळीच झाली असती; आणि आम्ही कधींच धुळीसही मिळालों असतों.

आतां, सामाजिक दृष्टीनें पाहिलें तरी देखील, असें अगदीं निर्विवाद ठरतें कीं, इस्लामशाहीचा फेरा आम्हांला कोणत्याही प्रकारें श्रेयस्कर म्हणून झालाच नाहीं. कारण, ह्या कारकीर्दींत, समाजोन्नति केवळ बाजूलाच राहून, अखिल हिंदु प्रजेला मात्र शिखानष्ट करण्याचा, व तिला

घालथें घालून रसातळास मिळविण्याचा अव्याहत प्रयत्न चालला होता.

अस्तु. प्रस्तुत भागांत आपल्याला समाजस्थितीचा विचार करण्याचें कांहीं एक कारणच नाहीं. सबब, तो विषय बाजूला ठेवून, सांप्रतच्या विषयाकडे वळतों.

यावनी शब्द, व ऊर्दू भाषा.

इस्लाम प्रभुत्वाखालीं, आरबी, तुरकी, आणि फारसी, इत्यादि भाषेंतील शब्दांची भर आमच्या प्राकृत भाषांत एकसारखी पडत चालली, व त्या कारणानें एक निराळाच शब्दकोश सहजीं प्रचारांत आला. इतकेंच नव्हे तर, मोगलाई अमलांत ऊर्दु नांवाची एक स्वतंत्र भाषाच पैदा झाली, असेंही म्हणण्यास कांहीं बाध येईलसें वाटत नाहीं.

ऊर्दु शब्दाचा मूळ अर्थ.

" ऊर्दु " हा शब्द तुर्की असून, त्या भाषेंत त्याचा अर्थ " राजदुर्ग " असा होतो. राजदुर्ग म्हणजे सुलतानाची राहण्याची जागा; अथवा त्याच्या मुक्कामाचें ठिकाण; किंवा त्याच्या स्वारीचा तळ होय. तेव्हां, अशा ठिकाणीं, भिन्न भिन्न प्रकारचा लोकसमुदाय जमल्यावर, त्यांच्यांतील परस्परांचे विचार प्रदर्शित करण्यासाठीं, ज्या सामान्य भाषेचा उपयोग करण्यांत आला, तिला ऊर्दु अशी संज्ञा प्राप्त झाली.

पुढें, इस्लामशाहीचा धुडकूस मातला असतांना, शिवा-

मराठेशाहीचा संस्कार.

जीनें आपला भगवा झेंडा उभारून, तो सर्वत्र फडकाविला जावा एतदर्थ, अश्रान्त परिश्रम चालविले. त्यामुळें, महाराष्ट्र साम्राज्याचा पाया घालणारा हा जो प्रतापी महापुरुष, त्याच्या कारकीर्दींत मराठी भाषेला बरेंच प्रोत्साहन मिळालें. तदनंतर, ह्या छत्रपतीची महत्वाकांक्षा, त्याची अनुपम देशसेवा, आणि त्याचा सदैव जागृत असलेला देशाभिमान, इत्यादिकांचें नेहमीं पुढेंच पाऊल सरकत असल्या कारणानें, मराठी भाषेची फुरमुंदीप्रमाणें यथाशक्ति सेवा करण्याला देखील, त्यानें मागें पुढें न पाहतां, वेळींच हातबोट लाविलें, आणि विद्वान पंडिताच्या साहाय्यानें, परकी भाषांतील प्रचारांत असलेल्या शब्दांचा एक सुरेख कोश[१] तयार करविला. नंतर, ह्याला त्यानें राजव्यवहार कोश असें नांव दिलें, आणि स्वभाषा ऊर्जित दशेंत आणण्यासाठीं, सर्व प्रकारचे हरएक बाजूनें यत्न केले. परंतु, महाराष्ट्र भाषेविषयीं अशा तऱ्हेची खरी कळकळ, पुढील कारकीर्दींत, महाराष्ट्र साम्राज्याचा भगवा झेंडा चोहोंकडे फडकत असतांही, कोणींच दाखविली नाहीं. त्याकारणानें, अखिल भरतखंडभर मराठी ही एक भाषा न होतां, तिचें घोडें मागेंच राहिलें. तथापि,

१ हा कोश रघुनाथ पंडित यांनीं तयार केला असल्याचें सर्वांस मशहूर आहे.

निदान कांहीं कालपर्यंत तरी, ती राजभाषाच बनून गेल्यानें, तिचा पगडा इतर प्राकृत भाषांवर सहजींच पडला असल्यानें दृष्टिगोचर होतें.

शीखशाहीचें प्राबल्य.

**मराठ्यां**चा भगवा झेंडा नमता होऊन, त्यांचें **प्रभुत्व** एकाएकीं मावळल्यावर, **पंजाबचा सिंह** जो सुप्रसिद्ध **रणजितसिंग**, हा आपल्या प्रज्वलित तेजानें उदयाचलीं एकदम भासमान होऊं लागला. इतकेंच नव्हें तर, त्यानें आपल्या उड्डाणानें सर्व **पंजाब** देश दणाणून सोडला. त्यामुळें, **शीख** लोकांचें प्राबल्य होऊन, **पंजाबी** भाषेला विशेष उत्तेजन मिळत चाललें.

आंग्ल प्रभुत्वाचा गंध.

तदनंतर, आमच्या सांप्रतच्या **आंग्ल** प्रभूंचा अम्मल, सर्व भरतखंडभर हळू हळू बसत चालला. त्या कारणानें, दरबारची आणि राजव्यवहारांतली भाषा कालान्तरानें **इंग्रजीच** होऊन, ती झपाट्यानें फैलावली, व अजूनही ती एकसारखी फैलावतच आहे. येवढेंच नाहीं तर, तिचा अचुक परिणामही आमच्या सर्व **प्राकृत** भाषांवर शनैः शनैः होत जात आहे, असें साधारण अवलोकनानें देखील प्रत्येकाच्या लक्षांत येऊन चुकेल. कारण, आमच्या **प्राकृत** भाषांत **इंग्रजी** शब्दांची भर प्रत्यहीं पडत चालली आहे, व नवीन नवीन शब्दही प्रचारांत येत आहेत.

आतां, जेथें जेथें इंग्रजी शब्दांची योजना अगदीं निरुपायास्तव, आणि केवळ आवश्यकतेमुळेंच केली आहे, तेथें मात्र त्या शब्दांचा सदुपयोग झाला, असें मानण्यास कांहीं एक प्रत्यवाय नाहीं. परंतु, ज्या ज्या ठिकाणीं त्यांची अप्रासंगिक, व भरमसाट, आणि खरोखर निष्कारण योजना केली आहे, तेथें त्यांचा निव्वळ दुरुपयोग होऊन, भलत्याच शब्दांची व्यर्थ खोगीरभरती मात्र झाली आहे असें म्हटल्यास, आपण रतिभार दोषासही पात्र होणार नाहीं.

व इंग्रजी शब्दांची भरमसाट खोगीरभरती.

असो. येथपर्यंत सामान्य दिग्दर्शन झालें. सबब, हल्लीं हिंदुस्थानांत ज्या भाषा प्रचारांत आहेत, त्यांचे मुख्य वर्ग दाखवून, नंतर एकंदर प्राकृत भाषांविषयीं यथावकाश विचार करूं.

सांप्रतकाळीं, भरतखंडांत भाषेचे जे एकंदर प्रकार दृष्टिगोचर होतात, त्यांचे स्थूलमानानें सहा वर्ग केले असतां, विषयविवेचनाला सोईवार पडेल असें समजून, ते येथें देतों.

भरतखंडांतील प्राकृत भाषांचे मुख्य वर्ग.

१ आर्य.
२ अनार्य.
३ कैकाडी.
४ गैंगाणी. ( अथवा गुंजारव ).

५ शर्मी. आणि
६ तुराणी.

आर्यवर्गांतील शाखा.

आतां, प्रत्येक वर्गांत, ज्या प्राकृत भाषांच्या शाखा आहेत त्या प्रथम देऊन, नंतर त्या प्रत्येकाची यथावकाश हकीकत लिहूं.

१ आर्य. यांत हिंदीआर्य, इराणीआर्य, व युरोपियन् आर्य, अशा तीन पोट शाखा आहेत. सबब त्या प्रत्येकाचें निरानिराळें विवेचन करूं.

हिंदी–आर्य.

हिंदीआर्य. यांत हिन्दी, बंगाली, मराठी, पंजाबी, गुजराथी, उरीय, ऊर्दू, सिन्धी, पश्चिमपहाडी, आसामी, मध्यपहाडी, मारवाडी, कच्छी, हळवी, काश्मीरी, गोवाणी, पूर्वपहाडी, आणि इतर किरकोळ, यांचा समावेश होतो.

इराणी–आर्य.

इराणीआर्य. यांत पश्तू, वलूची, व इराणी, यांची गणना होते.

युरोपियन–आर्य.

युरोपिअनआर्य. यांत इंग्रजी भाषा मोडली जाते.

२ अनार्य. यांत द्रविड, कुलाल, आणि तिबेटी–

१ द्राविडी भाषा नूतन मताप्रमाणें अनार्य वर्गांत घातल्या आहेत सबब, त्यास अनुसरूनच पुढील विवेचन आहे, असें समजावें.

( पुढें चालू. )

अनार्य वर्गांतील शाखा.

—ब्रह्मी, अशा तीन पोट शाखा असून, त्यांचा तपशील खालीं लिहिल्याप्रमाणें आहे.

द्राविड.

**द्राविड.** यांत तेलंगी, तामिल, कानडी, मल्याळी, गोन्द, टुलू, ओराणी, कोंड, कोडगू, माळपहाडी, ब्राहुई, व इतर किरकोळ भाषा, यांचा समावेश होतो.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

तथापि, माझें स्वतःचें मन तसें नसून, हे **द्राविड** लोक **आर्य** शाखेंतीलच असावेत, अशी कल्पना होण्याला अनेक कारणें दिसून येतात. एतद्विषयक साधक बाधक कारणांचा तपशिलवार ऊहापोह पुढील भागांत केला आहे, सबब तिकडे लक्ष्य पुरविण्याविषयीं वाचकांस विनंती आहे. मात्र, मी येथें इतकेंच सुचवितों कीं, इ. स. १८७१ सालच्या नवंबरच्या **कॉर्नहिल मॅगझीन** नामक मासिक पत्रकांत, **द्राविड** हे **आर्यां**चेच वंशज असून, त्यांची भाषा देखील **आर्य** शाखेपैकींच असल्याचें लिहिलें आहे. सदरहू पत्रकांतील आशय खालीं लिहिल्याप्रमाणें होय.

"Dr. Caldwell is wrong in asserting that the Dravidians are a Turanian people; and that in reality they *represent lineally an off-shoot from the great parent stock which left the father-land* ( of the Aryas ) *long before Sanskrit was grown into vigour, and about the same period that* the Teutonic wave flowed into Europe. There is *scarcely* a Dravidian *root which does not appear in* Gothic, Anglo-Saxon, or Icelandic."

( Corn Hill Magazine. November. 1871. P. 570. ).

कुलाल. यांत संताळ, मुंडा, कोल, कोरवा, कूर, भील, सावर, खरिया, वैग, भिन, आणि गडब, ह्या मोडतात.

कुलाल.

तिबेटी–ब्रह्मी. यांत ब्रह्मी, आराकनी, कचारी, नेपाळी व तिचे पोटभेद, गारो, तिप्पर, खीन, नाग आणि तिच्या पोटशाखा, मिकीर, मेच, काथे ( मणिपुरी ),मिरी–अबूर, कुकी, लालुंग, लुशाई, तिबेटी, व अन्य किरकोरळ, यांची गणना होते.

त्रिविष्टप-ब्रह्मी.

३ कैकाडी. यांत खासी, वणजारी, लमाणी, वडारी, आणि रामोशी, इत्यादिकांचा समावेश होतो.

कैकाडी.

४ गैंगाणी. यांत शान ( ताई ), मोन, कारेन, जपानी, व चिनी, ह्या मोडतात.

गैंगाणी.

५ शामी. ह्यांत हीब्र्यू, आरबी, हबशी, आणि सिरियन भाषा गणल्या जातात.

शामी.

६ तुराणी. यांत तुर्की, उजबेगी, यार्कंडी, फिनू, व मध्यार, यांचा समावेश होतो.

६ तुराणी.

सदरहू प्रमाणें एकंदर वर्गवारीचा स्थूल विचार

झाला. सबब, ह्या प्रत्येक वर्गांत ज्या प्राकृत भाषा येतात, त्या संबंधानें थोडासा सूक्ष्म विचार करून, त्यांचा यथावकाश तपशील देऊं

सदरीं दाखल केलेल्या वर्गवारींत, **हिंदीआर्य** नांवाची जी शाखा आहे, ती प्रमाणानें आणि फैलावाच्या मानानें पुष्कळच विस्तृत असल्या कारणानें, तीच प्रथम घेऊन तिच्या पासून सुरवात करूं. मात्र, या शाखेंतील **प्राकृत** भाषांचा उहापोह करण्यापूर्वी, आपल्याला तत्संबंधानें प्रांतिक विभाग केले पाहिजेत; म्हणजे एकंदर विषयविवेचनाला सोईचें पडून, तें विसंगत दिसणार नाहीं.

हिंदी आर्यांतील समुदाय.

आतां, **हिंदीआर्य** भाषांतील **प्राकृत** शाखांत, एकंदर मुख्य प्रकार कमींत कमी सतरा आहेत. त्यापैकीं, कांहीं उत्तरेकडे प्रचारांत आहेत. कित्येक पश्चिमेकडे चालू आहेत. आणि बाकीचे पूर्वेकडील भागांत फैलावलेले आहेत. सबब, १ **उत्तर समुदाय**, २ **पश्चिम समुदाय**, आणि ३ **पूर्व समुदाय**, असें वर्गीकरण करून, आपण त्यांची व्यवस्था लावूं.

---

१ ह्या संबधानें, पुढें दिलेले आहवालाचे आंकडे, मी अगदीं कृतज्ञतापूर्वक, मिस्तर बेन्सच्या इ. स. १८९१ च्या सेन्सस् रिपोर्टांतून घतलेले आहेत. ( ग्रंथकर्ता. ).

## उत्तरसमुदाय.

उत्तरसमुदायांतील प्रकार.

ह्यांत, हिन्दी, पश्चिमपहाडी, मध्यपहाडी, पूर्वपहाडी, पंजाबी, काश्मीरी, व हिंदुकूश-भाषा, यांचा समावेश होत असून, ह्या भाषा बोलणारांची लोकसंख्या खालीं लिहिलेल्या कोष्टकांत दाखविली आहे. त्यावरून त्यांचा सर्वसाधारण अहवाल कळून येईल.

| भाषेचा प्रकार. | ती बोलणारांची लोकसंख्या. |
|---|---|
| हिन्दी. | ८,५६,७५,३७३ |
| पश्चिमपहाडी. | १५,२३,२४९ |
| मध्यपहाडी. | ११,५३,२३३ |
| पूर्वपहाडी. | २४,२६२ |
| पंजाबी. | १,७७,२४,६१० |
| काश्मीरी. | २९,२७६ |
| हिंदुकूशभाषा. | १७ |
| एकूण. | १०,६१,३०,०२० |

## पश्चिमसमुदाय.

पश्चिम समुदायांतील प्रकार.

ह्यांत, सिन्धी, कच्छी, मारवाडी, गुजराथी, मराठी, आणि गोवाणी, या भाषा मोडतात. ह्या बोलणारांची संख्या

दिग्दर्शनार्थ खालीं दाखविलेल्या कोष्टकांत दिली आहे, त्यावरून मुकाबिल्यास चांगलें साधन मिळेल.

| भाषेचा प्रकार. | ती बोलणारांची लोकसंख्या. |
|---|---|
| सिन्धी. | २९,९२,३४१ |
| कच्छी. | ४,३९,६९७ |
| मारवाडी. | ११,४७,४८० |
| गुजराथी. | १,०६,१९,७८९ |
| मराठी. | १,८८,९२,८७५ |
| गोवाणी. | ३७,७३८ |
| एकूण. | ३,३७,२९,९२० |

## पूर्वसमुदाय.

पूर्वसमुदायांतील प्रकार.

यांत, हळबी, उरीय, बंगाली, व आसामी, यांची गणना होते. ह्या भाषा बोलणारांच्या अहवालांचें कोष्टक या खालीं जोडलें आहे.

| भाषेचा प्रकार. | ती बोलणारांची लोकसंख्या |
|---|---|
| हळबी. | १,४३,७२० |
| उरीय. | ९०,१०,९५७ |
| बंगाली. | ४,१३,४३,६७२ |
| आसामी. | १४,३५,८२० |
| एकूण. | ५,१९,३४,१६९ |

इराणी आर्यांतील प्रकार.

**इराणी**–आर्यशाखेंत इराणी, आर्मीनियन, पखतु अथवा पष्टु, आणि बलूची, या भाषांचा समावेश होतो.

| भाषेचा प्रकार. | ती बोलणारांची संख्या. |
|---|---|
| इराणी. | २८,१८९ |
| आर्मीनियन्. | ८३३ |
| पखतु (किंवा पष्टु). | १०,८०,९३१ |
| बलूची. | २,१९,४७५ |
| एकूण. | १३,२९,४२८ |

युरोपियन आर्यशाखेंतील समुदाय व प्रकार.

**युरोपियन-आर्य** शाखेंत एकंदर चोवीस भाषा मिश्रित असल्याचें दिसून येतें. ह्या भाषा भिन्न भिन्न देशांत निरनिराळ्या प्रचारांत आहेत. त्या कारणानें, प्रांतिक विभागास अनुसरून त्यांचे पांच समुदाय केले आहेत, व त्यांचा तपशील खालीं लिहिलेल्या कोष्टकांत दाखविला आहे.

| समुदायाचें नांव. | भाषेचा प्रकार. | ती बोलणारांची लोकसंख्या. |
|---|---|---|
| ट्युटॉनिक. | इंग्रजी. | २,३८,४९९ |
| | जर्मन्. | २,२१९ |
| | डच्च. | ११९ |
| | फ्लेमिश. | २२ |

| | | |
|---|---|---|
| स्कांडिनेव्हियन्. | डॉनिश. | ९४ |
| | स्वीडिश. | १८७ |
| | नॉर्वेजियन्. | १५२ |
| सेल्टिक्. | वेल्श. | २४५ |
| | ग्यालिक. | २६४ |
| | आयरिश. | २९९ |
| | सेल्टिक. (बिनतपशील) | २ |
| भूमध्यसमुद्रीय. | ग्रीक. | ३८० |
| | लॅटिन्. | १ |
| | इटालियन्. | ६९० |
| | माल्टीज. | ३२ |
| | रुमेनियन्. | २२ |
| | स्पॅनिश. | १५९ |
| | फ्रेंच. | २,१७१ |
| स्लॉव्हॉनिक. | रूस. | ९५ |
| | पोलिश. | ४६ |
| | झेच. | १ |
| | बल्गेरियन्. | ४९ |
| | स्लॉव्हॉनिक. (बिनतपशील) | १ |
| | बास्क. | १ |
| | एकूण यूरोपियन्. | २,४५,७४६ |

आतां, **अनार्य**भाषेकडे क्षणभर वळूं, आणि एकंदर तुळनेसाठीं, तिच्या पोटशाखांतील आहवालाचे आंकडे देऊं.

अनार्यभाषेचें वर्गीकरण.

पूर्वी सांगितल्याप्रमाणें, **अनार्य**भाषेच्या मुख्य तीन शाखा आहेत. **१ द्रविड, २ कुळाल,** आणि **३ त्रिविष्टप-ब्रह्मी.** तथापि, त्यांतही प्रमाणानें व फैलावाच्या मानानें विशेष विस्तृत झालेली अशी **द्रविड**च होय. सबब, तिजविषयीं प्रथम विवेचन करूं.

उत्तर समुदायांतील प्रकार.

**द्रविड** शाखेंत दोन समुदाय आहेत. **१ उत्तर समुदाय,** आणि **२ दक्षिण समुदाय.** उत्तर समुदायांत गोंड, कोंड, ओराणी, माळ-पहाडी, खरवारी, व ब्राहुई, इतक्या भाषांचा समावेश होत असून, त्या भाषा बोलणारांची संख्या खालील कोष्टकांत दर्शविली आहे.

| भाषेचा प्रकार. | ती बोलणारांची लोकसंख्या. |
|---|---|
| गोंड. | १३,७९,५८० |
| कोंण्ड. | ३,२०,०७१ |
| उरोण. | ३,६८,२२२ |
| माळ-पहाडी. | ३०,८३८ |
| खरवारी. | ७,६५१ |
| ब्राहुई. | २८,९९० |
| एकूण. | २१,३५,३५२ |

दक्षिण समुदायांतील प्रकार.

**दक्षिण समुदायांत** तामिल, तेलंगी, कानडी, कोडगु, मल्याळी, टुलु, तोड, कोट, सिंहली, आणि महाली, या भाषा मोडतात. ह्या भाषा बोलणारांचें प्रमाण खालील कोष्टकावरून ध्यानांत येईल.

| भाषेचा प्रकार. | ती बोलणारांची संख्या. |
|---|---|
| तामिल. | १, ५२, २९, ७५९ |
| तेलंगी. | १, ९८, ८५, १३७ |
| कानडी. | ९७, ५१, ८८५ |
| कोडगू. | ३७, २१८ |
| मल्याळी. | ५४, २८, २५० |
| टुलु. | ४, ९१, ७२८ |
| तोड. | ७३६ |
| कोट. | १, २०१ |
| सिंहली. | १८७ |
| महाली. | ३, १६७ |
| एकूण. | ५, ०८, २९, २६८ |

कुलाल भाषेंतील प्रकार.

**कुलाल** वर्गांत संताळ, मुंडा किंवा कोल, खऱ्या, बैग आणि भुंजा, कोरवा अथवा कूर, भील, साबर, गडब, जुआंग आणि मालेर, यांचा समावेश होतो.

| भाषेचा प्रकार. | ती बोलणारांची लोकसंख्या. |
|---|---|
| संताळ. | १७,०९,६८० |
| मुंडा, अथवा कोळ. | ६,५४,५०७ |
| खऱ्या. | ६७,७७२ |
| बैग आणि भुंजा. | ४८,८८३ |
| कोरवा किंवा कूर. | १,८५,७१५ |
| भीळ. | १,४८,५२६ |
| सावर. | १,०२,०३९ |
| गडब. | २९,७८९ |
| जुआंग व मालेर. | ११,९ ५ |
| एकूण | २९,५९,००६ |

तिबेटी–ब्रह्मी भाषेंतील प्रकार.

त्रिविष्टप–ब्रह्मींत, बऱ्याच पोटभेदांचा समावेश होत असून, ह्या शाखेचे, प्रांतिक विभागास अनुसरून, एकंदर सात समुदाय केले आहेत. ह्या संबंधाची तपशीलवार हकीकत विशेष अवश्यकतेची आणि महत्वाची आहे. सबब, तीही खालीं लिहिलेल्या कोष्टकांत दिली आहे. तसेंच, जरूर त्या मुकाबिल्यास आहवालाच्या आंकड्यांचें साधन मिळावें एतदर्थ, उपलब्ध असलेले आंकडे देखील त्यांत नमुद केले आहेत.

| भाषेचा प्रकार. | ती बोलणारांची संख्या. |
|---|---|
| १ तिबेटी. | २०,५४४ |
| कनावरी. | ९,२६५ |
| नेपाळी. ( बिन-तपशील. ) | १,४१,२७३ |
| ,, मुर्मी. | २०,५९७ |
| ,, मन्गर. | ११,२८१ |
| ,, लिंबू | १२,६०५ |
| ,, नेवारी. | ५,२१७ |
| ,, सुनुवार. | ४,२३६ |
| ,, अन्यपोटभाषा. | ६५७ |
| लेप्चाई. | १०,१२५ |
| भुतानी. | ९,४७० |
| एकूण हैमवत समुदाय. | २,४५,२७१ |
| २ बोडो ( कचारी ) | १,९८,७०५ |
| गारो. | १,४५,४२५ |
| लालुंग. | ४०,२०४ |
| कोच. | ८,१०७ |
| मेच. | ९०,७९६ |
| तिप्पर. | १,२१,८६४ |
| बोडो शाखेंतील अन्य पोट भाषा. | ४,३१४ |
| एकूण बोडो समुदाय. | ६,०९,४१५ |

| | |
|---|---|
| ३ मिरी–आबोर. | २९,७०३ |
| सरहद्दीवरील अन्य पोटभेद. | १,२८२ |
| एकूण ईशान्य समुदाय. | ३६,९८९ |
| ४ नाग ( पोटभाषा एकंदर सात. ) | १,०२,९०८ |
| मिकीर. | ९०,२३६ |
| खाखिन् व लुशाई. | ५,६६९ |
| एकूण नाग–खाखिन् समुदाय. | १,९८,८१३ |
| ५ मणिपुरी ( अथवा काथे ) | ८८,९११ |
| कुकी. | १८,८२८ |
| झो (किंवा लुशाई.) | ४१,९२६ |
| खिन्. | १,२६,९१५ |
| एकूण खिन् लुशाई समुदाय. | २,७६,५८० |
| ६ आराकनी. ( मघ ) | ३,६६,४०३ |
| ब्रह्मी. | ५५,६०,४६१ |
| एकुण ब्रह्मी समुदाय. | ५९,२६,८६४ |
| ७ निकोबारी. | १ |
| एकूण त्रिविष्टप–ब्रह्मी समुदाय. | ७२,९३,९२८ |

कैकाडी भाषेंत लमाणी, वणजारी, वडारी,

कैकाडीभाषेचे प्रकार.

भटकणाऱ्या लोकांच्या

समावेश होतो.

| भाषेचा प्रकार. | ती बोलणारांची सं |
|---|---|
| कैकाडी. | ४,००,०० |

गेंगाणी भाषेंत मोन, पलुंग, शान, लाव,

गेंगाणी भाषेचे प्रकार.

खामटी, पाखियाल, चिनी,

इत्यादि भाषा मोडतात. ह्या बहुतेक अनुनासिक कारणानें, त्यांजला गेंगाणी अशी संज्ञा आहे.

| भाषेचा प्रकार. | ती बोलणारांची संख |
|---|---|
| मोन. | २,२६,४९ ५ |
| पलुंग. | २,८४ ५ |
| शान. | १,७४,८७ १ |
| लाव, (किंवा हेताई.) | ४ |
| ऐतोन. | २ |
| खामटी. | २,९४ ५ |
| पाखियाल. | ६२ ५ |
| चिनी. | ३८,५० ४ |
| कारेन. | ६,७४,८४ ६ |
| एकूण. | ११,२१,१३ ० |

शर्मी भाषेंत आरबी, हिब्र्यू किंवा ज्यू, आणि सीरिअन्, यांचा समावेश होत असून, त्या बोलणारांची संख्या खालीं दाखविलेल्या कोष्टकांत दिली आहे.

शर्मी भाषेचे प्रकार.

| भाषेचा प्रकार. | ती बोलणारांची लोकसंख्या. |
|---|---|
| आरबी. | ९३,३५१ |
| हिब्र्यू. | २,१७१ |
| सीरियन्. | १२ |
| एकूण. | ९५,५३४ |

तुराणी भाषेंत तुर्की, फिन्न, आणि मग्यार, या भाषा खालीं दर्शविल्या प्रमाणें मोडतात.

तुराणी भाषेचे प्रकार.

| भाषेचा प्रकार. | ती बोलणारांची संख्या. |
|---|---|
| तुर्की. | ६०७ |
| फिग्या. | १० |
| मग्यार. | ४२ |
| एकूण. | ६५९ |

सदरहू आहवालच्या आंकड्यावरून, भरतखंडांत चालू असलेल्या एकंदर भाषांविषयीं सामान्य दिग्दर्शन होण्या-

सदरहू भाषांचें तपशीलवार विवेचन.

सारिखें आहे. सबब, आतां प्रत्येक भाषेसंबंधीं अवश्य तो तपशील देऊन, राहिलेल्या मुद्यांच्या गोष्टींचा यथावकाश विचार करूं.

हिंदी भाषा.

हल्लीं **भरतखंडांत** ज्या प्राकृत भाषा प्रचारांत आहेत, त्यांत **हिंदी** ही विशेष फैलावलेली होय. अर्थात् "**हिंदी**" हा शब्द जरा व्यापक आहे, त्यामुळें ह्या भाषेंत दुसऱ्या कित्येक पोटशाखांचा समावेश होतो. उदाहरणार्थ, **यमुना** आणि **राजमहाल** यांच्या दरम्यान असलेल्या प्रदेशांतील पोटभेद, तसेंच **उत्तर हिंदुस्थानच्या** आग्नेयीस, दक्षिणेस, आणि पश्चिमेस चालू असलेले प्रकार, असे त्यांत मोडतात. आतां, हे प्रकार म्हटलें म्हणजे **व्रज**, **बैसवारी**, **भोजपुरी**, **मैथिली**, **बुन्देली**, **बाघेली**, **रांगडी**, **नेमाडी**, **लारिया**, **हिंदुस्थानी**, **ऊर्दु**, **पंजाबी**, **पहाडी**, आणि **काश्मीरी**, इत्यादि होत.

तिची व्यापकता.

तिच्यांत अन्य शाखांचा समावेश.

**वृज**, **बैसवारी**, **भोजपुरी**, **मैथिल**, वगैरे, **यमुना** आणि **राजमहाल** यांच्या दरम्यान प्रचारांत आहेत. **बुन्देली**, **वाघेली**, **रांगडी**, व **नेमाडी**, इत्यादि **उत्तर हिंदुस्थानच्या** दक्षिणेस आणि पश्चिमेस बोलण्याचा रिवाज आहे. **लारिया** ही आग्नेयी दिशेला बोलतात.

हिंदुस्थानी व ऊर्दु.

**हिंदुस्थानी** ही वायव्यप्रांत व अयोध्याप्रांत, येथें प्रचारांत आहे. **हिन्दी** आणि **ऊर्दू**मध्यें फारसा फरक नाहीं. मात्र, भेद ह्मणून इतकाच कीं, **ऊर्दूंत फारशी** शब्दांचा विशेष भरणा आहे. शिवाय, शिक्षा व कोश, ह्मणजे शब्दोच्चार आणि शब्दसंग्रह, यांसंबंधानेंही **हिन्दी** व **पंजाबी** यांच्यांत थोडाबहुत भेद आहे.

पंजाबी व तिचे पोट-भेद.

**पंजाबीच्या** तीन पोटशाखा आहेत. १ **जतकी** अथवा **मुलतानी**, २ **दोग्री**, आणि ३ **पहाडी**. **जतकी** किंवा **मुलतानी** ही **सिंधु** नदीच्या सपाट मुलुखांत, आणि **सिंध** प्रांताच्या सरहद्दीवर प्रचारांत असून, ती बोलणारांची संख्या १७,९०,००० आहे. **दोग्री** ही **जम्मू** प्रांताच्या पश्चिमेकडे, व **काश्मीरच्या** डोंगराळ प्रदेशांत चालते. किंबहुना, **काश्मीर** संस्थानांत हीच विशेषतः प्रचारांत आहे, असेंही म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. **पहाडी** भाषा बोलणारे सुमोर १,९०,००० असून, **पंजाब** प्रांताच्या दक्षिणेस **पंजाबी** भाषेंत **बाग्री** शाखेचें मिश्रण झालेलें आहे. **पंजाबी** भाषा **हिंदुस्थानांत** आणि **ब्रह्मदेशांत** पुष्कळ लोक बोलतात. तथापि, **प्राकृत** भाषा ह्मणून, ती केवळ **पंचनद** ( पंजाब ) प्रांतांत मात्र सर्वत्र प्रचारांत आहे.

**काश्मिरी** भाषा **काश्मीर** संस्थानच्या बाहेरही थोडीबहुत प्राचारांत आहे. कारण, कोष्टी, सुतार, आणि शालींचे व्यापारी, इत्यादि कित्येक **काश्मीरी** लोकांनीं **पंजाबांत**च जाऊन वसाहती केल्या असल्या कारणानें, ते **काश्मीरीच** भाषा बोलतात.

काश्मीरी व हिंदु-कूश शाखा.

**पंजाबांत, हिंदुकुश** व त्याच्या अजूबाजूच्या टापूंतील कांहीं लोक येऊन राहिलेले असून, ते तिकडील पोटशाखा बोलतात. उदाहरणार्थ, **गिलजित्, चित्रल, काफरिस्थान**, आणि **हुणझा**, येथील लोक त्या त्या ठिकाणच्या भाषा बोलतात. तथापि, त्या विशेष महत्वाच्या नसल्यामुळें, त्याची तपशीलवार हकीकत देण्याचें कारण दिसत नाहीं.

हिंदुकुश शाखा.

**सिंध**प्रांत हा सरहद्दीवर असल्या कारणानें, **सिंधी** भाषेंत, **फारसी, आरबी, काबुली, हिंदी**, इत्यादि भाषांचें मिश्रण झालें आहे. ही भाषा फार फैलावलेली नसून, **सिंध** प्रांताबाहेर, ती फक्त **कच्छ** आणि **भावलपूर** संस्थानांत मात्र बोलतात.

सिन्धी.

**कच्छी** व **सिन्धी** यांच्यांत फारच साम्य आहे. मात्र, कच्छचा **गुजराथे**शीं राजकीय आणि प्रांतिक असा विशेष

कच्छी.

निकट संबंध पडल्या कारणानें, **कच्छी** भाषेंत **गुजराथी**ची जास्त मेळ आहे.

मारवाडी. -

**मारवाडी** ही **राजपुतान्या**च्या **दक्षिण** सरहद्दीला प्रचारांत असून, ती **गुजराथी**शीं विशेष साम्य पावते. किंबहुना, **हिंदी** आणि **गुजराथी** या दोहोंच्याही जवळजवळच ती आहे, असें देखील ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. **मारवाडी** भाषा बहुतेक सर्वत्र प्रचारांत आहे. कारण, **राजपुतान्यां**तील **मारवाडी** लोक हे व्यापारनिमित्त अखिल **भरतखंड**भर चोहोंकडे पसरलेले आहेत. आणि **काश्मीर**पासून तों **आसाम**पर्यंत, व **हिमालया**पासून तों तहत **कन्याकुमारी**पर्यंत, ह्या लोकांचीं घरें दारें, जमीन जुमला, वसाहती व ठाणीं, वखारी आणि पेढ्या, दुकानें व कारखाने, इत्यादि सर्व केवळ व्यापारनिमित्तच इतस्ततः फैलावलेले दृष्टीस पडतात.

गुजराथी.

**गुजराथी** भाषा एकंदर **गुजराथ**प्रांतांत प्रचारांत आहे. हींत, **फारसी** व **आरबी** भाषेंतील शब्द बरेच घुसडलेले दिसतात. **इस्लामशाही**च्या अनन्वित जुलुमानें संत्रस्त होऊन जे **पारसी** लोक **इराणां**तून **हिंदुस्थानां**त आले, त्यांनीं देखील आपल्या मुळभाषेचा त्याग करून, **गुजराथी**चेंच पूर्ण अवलंबन केलें आहे. किंबहुना, ते मुळचे ह्याच

देशांतले असल्या कारणानें, त्यांनीं आर्यभाषेच्या ह्याच शाखेचा स्वीकार केला, असेंही ह्मणण्यास कांहींएक हरकत नाहीं. असो. पाटणूली ही ह्याच भाषेची एक शाखा असून, ती मद्रास आणि ह्मैसूर प्रांतांत बोलतात. मद्रास परगण्यांत ही पोटशाखा बोलणारांची संख्या ७७,००० वर आहे.

मराठी.

आर्यशाखेंतील पश्चिम समुदायांत, मराठी ही सर्वांत श्रेष्ठ होय. कारण, प्रसाद आणि चारुता, व भाषासौन्दर्य आणि पदलालित्य, यां संबंधानें ती विशेष महत्वाची आहे. इतकेंच नाहीं तर, ती बोलणारांची संख्या देखील खरोखर मोठी आहे, असेंही म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

परकीयांच्या स्वाऱ्यांचा आम्हां महाराष्ट्रीयांवर बराच कालपर्यंत काडीमात्रही जोर न चालल्या कारणानें, आणि जेव्हां जेव्हां क्वचित् प्रसंगीं आह्मांवर हल्ला झाला, तेव्हां तेव्हां आह्मांकडून त्यांचा वेळींच योग्य प्रतिकार होत गेल्यानें, आमच्या स्वातंत्र्याला, अगदीं अखेर होईपर्यंत, ह्मणण्यासारखा धक्का पोहोंचला नाहीं. त्यामुळें, आमची मराठी भाषा बरीच सोंवळी राहिली, हें उघड आहे.

ह्या भाषेचा प्रांतिक विस्तार पुष्कळच असल्याच

तिचा प्रसार.

भासतें. कारण, तापीनदीच्या किंबहुना विंध्याद्रीच्याही दक्षिणेकडील बहुतेक पठार, वऱ्हाड, मध्यप्रांत, नागपूर, कोंकण, निजामचा कांहीं मुलूख, म्हैसूर प्रांताचा कांहीं भाग, तंजावर, गुजराथ प्रांतांतील बडोदें संस्थान, आणि विंध्याद्री पलीकडील इंदूर व ग्वाल्हेर हीं संस्थानें, इत्यादि ठिकाणीं मराठी फारच फैलावलेली आहे.

तिची मजा.

मराठींत द्विरुक्तीचा किंवा पुनरुक्तीचा जास्त प्रघात असल्यानें, कित्येकांस ही भाषा फारच गमतीदार दिसून, ती विशेष मजेदार वाटते. उदाहरणार्थ, "दगडबिगड," "ताटबीट" "सामानसुमान," "लगवग," "झटपट," "पाद्रीबिद्री" "आडोशीपडोशी," "हुंडाबिंडा, इत्यादि.

तिच्यासंबंधानें यूरोपस्थांचें मत.

मराठी भाषेसंबंधीं लिहित असतांना, मिस्तर बेन्स सेन्सस् कमिशनर हे असें म्हणतात कीं,

"Marathi is the chief language in the Western group. In structure and vocabalary it is remarkable for its adherence to the later Sanskrit dialects of North India, and

१ ही द्विरुक्ति करते वेळीं, देशस्थांत "ब" काराच्या ऐवजीं "ग" काराचा आदेश करण्याची चाल आहे. उदाहरणार्थ, "दगडगिगड," "पाटगीट," वगैरे.

may be called particularly Brahmanic in all its elements. It has suffered less change than the rest of its companions, and retains much of the complexity of grammatical form that has been sloughed off by Hindi and Gujrathi. The Bráhmans of Western India have for generations borne a high reputation for scholarship, and as the region under their influence was late in receiving the shock of Musalmãn invasion, and more or less successful in repelling it the Hindu character of the language has been well maintained, whilst its fertility has enabled it to develop without the expedient of continually taking to itself fresh grafts from the the Srnskrit. It is, what some writers have called, a "playful" tongue, aboundjng in jingles and alliterations. "—

( Mr Baine's Census Report. 1891. P. 141 ).

हळबी.

हळबी भाषा हिंदीशीं विशेष साम्य पावते. तथापि, तिच्या सांप्रतच्या प्रांतिक स्थितीवरून, तिची गणना प्राच्य समुदायांतच करण्यांत आली आहे. ही मध्यप्रांताच्या आग्नेयीस, व जवळ आसपासच्या प्रदेशांत प्रचारांत आहे. ही फक्त १,४३,७२० लोक बोलतात.

उरीय.

**उरीय** किंवा **उत्कली** ही **ओरिसांतील प्राकृत** भाषा होय. ही **ओरिसा**, **मध्यप्रांत**, आणि **मद्रास** इलाख्याचा कांहीं भाग, येथें प्रचारांत आहे.

बंगाली.

संख्येच्या मानानें पाहिलें तर, **बंगाली** भाषा प्राच्यसमुदायांत फारच विस्तृत असल्याचें दिसतें. आणि **आर्य** भाषेच्या ज्या एकंदर **प्राकृत** शाखा आहेत त्यांत, **हिन्दीनन्तर**, हीच दुसऱ्या शेजेला बसणारी आहे. तथापि, ही अठरा धान्याचें कडबोळें आहे, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. कारण, तिच्यांत अनेक पोटशाखांची भेळ झालेली आहे. सर्व **प्राकृत** भाषांत हीच अगदीं आर्वाचीन असून, तिचा उदयकाळ **दिल्लीचें** राज्य मावळल्यापासून झाला, असेंही ह्मटल्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. ही **बंगाल**, **आसाम**चा दक्षिणप्रदेश, आणि **आराकान**, या प्रांतांत प्रचारांत आहे.

आसामी.

**आसामी** भाषा **आसाम**च्या दरींत आणि नजीक आसपास बोलतात. **उरीय** भाषेप्रमाणें ही देखील **बंगाली** भाषेची पोटशाखा समजून, ह्या दोन्हीसही शाळांत व विद्याखात्यांत आज्ञिबात ढाळक देण्याचा विचार होता.

परंतु सुदैवानें तसें न होतां, त्यांचा परामर्श झाल्यानें, त्या ज्या त्या प्रदेशांत आजमित्तीससुद्धां प्रचारांत आहेत.

आतां, आर्यशाखांपैकीं **फारशी**, **आर्मीनियन्**, आणि **पखतु**, यांचें दिग्दर्शन करून **अनार्य** भाषांकडे वळूं.

फारशी किंवा इराणी.

**फारसी** किंवा **इराणी** भाषा **बंगाल**, **पंजाब**, आणि **मुंबई**, येथें थोडी बहुत प्रचारांत आहे. मात्र, ती **दिल्लीच्या** राजघराण्यांतील अवशिष्ट राहिलेले लोक, **अफगाणिस्थानां**तील व्यापारी लोक, व **इराणांतले अश्वपारखी**, इत्यादि बोलतात.

आर्मीनियन्.

**आर्मीनियन्** भाषा बोलणारे लोक थोडेच असून, ते **बंगाल्यांत** आहेत.

पखतु.

**पखतु** किंवा **पष्टु** ही **पठाण** ( परवत्वान् ) लोकांची भाषा होय. ही **आर्य हिंदु** शाखेंतली असून देखील, हिच्यांत **इराणी** शब्दांचा पुष्कळच भरणा आहे. ही भाषा बोलणारे लोक **पंजाबांत** आहेत.

बलूची.

**बलूची** भाषा **इराणीशीं** विशेष साम्य पावते, व ही खालच्या **पंजाबांत** आणि **सिंध** प्रांतांत बोलतात.

**अनार्य** भाषांपैकीं, फक्त **तामिलच** कायती विशेष

तामिल

परिपक्व दशेप्रत पोहोंचलेली आहे. त्यामुळें, तिची फार महत्वी असून, तिच्या गुणानेंच तिचा सर्वत्र परिमल सुटला असल्याचें दिसतें. हिच्या दोन पोटशाखा आहेत. १ **इरुलार**, आणि २ **कुरुंबार**. ही भाषा **दक्षिणहिंदुस्थानां**त थेट **म्हैसूर** आणि **पश्चिमघाटप**र्यंत, व **उत्तरे**च्या बाजूला अगदीं **वऱ्हाड**-पर्यंत विस्तृत आहे. शिवाय दक्षिणेकडील मजूरदार आणि काबाडी लोकांत हिचा विशेष फैलाव असून, **सिंहलद्वीपांत** व **ब्रह्मदेशांत** जे लोक इकडूनच नोकरीच्या पेशानें जातात, ते देखील हीच भाषा बोलतात.

मल्याळी.

**मल्याळी** ही **मलबार** किनाऱ्यावरील भाषा होय. **मलबार** हा **मलयवरा**चा अपभ्रंश असून, “ **मल्याळी** ” म्हणजे **मलय** देशांत, अथवा **मलय** पर्वतानजीकच्या भागांत बोलत असलेली भाषा समजावयाची. ही **तामिल**चीच एक पोटशाखा आहे.

कानडी.

**कानडी** भाषेचें **तामिल**शीं विशेष साम्य असून, ती **म्हैसूर**, **कूर्ग**, **पूर्वकिनाऱ्यावरील** कांहीं भाग, **निजाम**चा पूर्वमुलूख, आणि **कृष्णा**तीरावरील प्रदेश, येथें बोलतात. हिच्यांत **तेलगू**च्याच वर्णसंज्ञेचा उपयोग केला आहे.

**तुलु** ही **दक्षिण कानड्यांत** प्रचारांत आहे. ही

टुलु. कानडी, कोडगु, मल्याळी, आणि तामिल, यांच्याशीं कांहीं साम्य पावते.

तेलगु. भाषागौरव, आणि भाषापौराणत्व, यांसंबंधानें अनार्य भाषांत तामिल नंतर तेलगु ही दुसऱ्या श्रेणीची आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. हिच्यांत कर्कशत्व मुळींच नसल्या कारणानें ती सुश्राव्य आहे; आणि तामिलपेक्षां ती खचित मधुरतर असल्याविषयीं, विद्वानांची समज आहे. तेलगूपासूनच वडारी आणि कैकाडी या भाषा उद्भवल्या आहेत. परंतु ठिकठिकाणच्या मिश्रणानें त्यांत सहजींच पुष्कळ फेरफार होत गेला. सबब, त्यांचा समावेश स्वतंत्र वर्गांत करून, त्यांजला कैकाडी अशी संज्ञा दिली आहे. तेलगूंत देवनगरी लिपीचाच उपयोग केला असल्याचें दिसतें. मात्र, भेद ह्मणून इतकाच कीं, तालपत्रावर लिहितां येऊं शकेल अशा रीतीनें अक्षरांस वळण देऊन, त्यांत थोडाबहुत फेरफार केलेला आहे. ही भाषा तामिलपेक्षांही जास्त प्रचारांत असून, ती मद्रास प्रांताच्या पूर्व किनाऱ्यावर, म्हैसुरांत, कर्नाटकांत, ओरिसा परगण्यांत, बहुतेक सर्व वऱ्हाडांत, आणि निजाम मुलुखांतल्या निम्मेशिम्मे भागांत, बरीच फैलावलेली आहे. इतकेंच नव्हे तर, निगापत्तन व कलिंगपत्तन येथून

जे जे लोक मजूरीनिमित्त **बंगालच्या** उपसागरांतून **ब्रह्म**-देशांत जातात, ते सर्व हीच भाषा बोलत असल्याकारणानें, तेथें देखील ह्याच भाषेचा प्रसार होत चालला आहे.

तोंड व कोट.

**तोंड** आणि **कोट** ह्या **द्रविड** भाषेच्याच पोटशाखा असून, त्या **तामिल** आणि **कानडी** भाषांशीं साम्य पावतात. ह्या फक्त **नीलगिरि** पर्वतांतील जातींतच प्रचारांत आहेत. **तोंड** भाषा जरा उच्च वर्गांतली असून, **कोट** त्यापेक्षां कांहीं उतरत्या दरजाची असल्या कारणानें, ती हलक्या प्रतीचे लोक बोलतात. इ. स. १८९१ सालीं, **तोंड** भाषा बोलणारांची संख्या ७२६ होती.

सिंहली आणि महाल.

**सिंहली** ही देखील **द्रविड** शाखेंतीलच होय. ही **सिंहलद्वीपांत** मात्र बोलतात. **महाल** ही तिचाच पोटभेद आहे. परंतु, ती फक्त **मिनिकोई** येथें मात्र प्रचारांत आहे. हें **मिनिकोई** नामक बेट **मालदिव** आणि **लकदिव** यांच्या दरम्यान आहे.

उत्तरेकडील अनार्य भाषा.

याप्रमाणें, **अनार्य** भाषेच्या ज्या शाखा व जे पोटभेद दक्षिण द्वीपकल्पांत फैलावलेले आहेत, त्यांचें अवश्य तेवढें दिग्-दर्शन करण्यांत आलें. सबब, आतां, उत्तरेकडे परिषा-

ठांत असलेल्या राहिलेल्या **अनार्य** शाखांचें यथावकाश विवेचन करूं.

गोंड.

**गोंड** भाषा **गोंडवण** प्रांतांत उद्भवली असून, तिचे अनेक पोटभेद झाले आहेत. कारण, **गोंडवण** प्रदेशांतले **अनार्य** लोक **बंगाल, वऱ्हाड, मद्रास,** आणि **निजाम**चा मुलूख, इत्यादि ठिकाणीं पसरले गेल्यामुळें, त्या त्या ठिकाणच्या भाषांची त्यांत सेळभेळ झाली आहे. **गोंडवण** म्हणजे "**अनन्वेषित प्रांत**" होय.

कोंड.

**कोंड** अथवा **खंड** भाषा **ओरिसा** प्रांतांतील डोंगराळ प्रदेशात रानटी जातींत बोलतात.

ओराणी, खरवारी, व ब्राहुई.

**गोंड** आणि **कोंड** भाषाप्रमाणेंच **ओराणी, खरवारी,** व **ब्राहुई,** ह्या देखील **द्रविड** शाखेंतीलच असल्याविषयीं अनेक भाषाकोविदांचें मत आहे. **ब्राहुई** भाषा बोलणारांची जास्त संख्या **बलुचिस्थानांत** सांपडते.

संताळ व

असो. आतां, **कुलाल** आणि **त्रिविष्टप-ब्रम्ही** शाखांकडे वळूं. **कुलाल** शाखेंत विशेष महत्वाची भाषा म्हटली म्हणजे **संताळ** होय. कारण, बहुतेक तीनचतुर्थांश भरणा हिचाच आहे. ही भाषा **बंगाल** आणि **आसाम** प्रांतांत बोलतात.

ह्या भाषेंत अनेक पोटभेद आहेत, आणि मुंडा, कोल,

मुंडा, भील, वगैरे पोटभेद.

हो, खऱ्या, बैग, भिंज्वा किंवा भुंजा, कूर, कोरवा अथवा कुर्कू, भील, गडब, सावर, जुआंग किंवा पतुआ, मालेर, इत्यादि सर्व हिचेच अपभ्रष्ट प्रकार होत.

खासी.

**खासी** भाषा **आसामां**तील खिंडींच्या दरम्यानच्या प्रदेशांत बोलत असून, ती **द्रविड**, **कुलाल**, किंवा **त्रिविष्टपब्रह्मी** शाखेपैकीं नसल्याविषयीं भाषाशास्त्रवेत्त्यांची समज आहे. हिचे तीन पोटभेद आहेत. १ **लिंगाम**, २ **दायको**, आणि ३ **सिंटेग**. **वेल्श** पाद्र्यांच्या प्रयत्नानें ही भाषा आतांशा **रोमन्** लिपींत लिहूं लागले आहेत.

तिबेटी.

**तिबेटी** भाषा **हिमालया**च्या उत्तरेकडील आणि दक्षिणेकडील पाणलोटाच्या प्रदेशांत, व **सिकिम** आणि **भुतान** देशांत बोलतात. **कणावरी** ही **सतलज**च्या उच्च दरींत, व **तिबेट** आणि **पंजाब**च्या दरम्यान असलेल्या **वाशहर** संस्थानांत प्रचारांत आहे. **रोंग** किंवा **लेप्चा** ही देखील **तिबेटी**चीच पोटशाखा आहे.

**नेपाळी**चे अनेक पोटभेद आहेत. ह्यापैकीं **गुरुंग**

नेपाळी.

आणि **मंगर** या शाखा **बंगाल्यांत** बोलतात, व **मुर्मी**, **लिंबू**, आणि **नेवारी**, या **आसामांत** चालतात.

कचारी, इत्यादि.

**कचारी**, **बोडो**, **ढिमाल**, **गारो**, **मेच**, **राभ**, **हजोंग**, **होजाई**, **लालुंग**, **कोच**, **तिप्पर**, इत्यादि पोटशाखा, **आसाम**, **ब्रह्मपुत्रा**, आणि **बंगाल**, या दरम्यानच्या प्रदेशांत परिपाठांत आहेत. **ब्रह्मपुत्रा**नदीच्या कांठच्या प्रदेशावर ज्या लोकांनीं वसाहत केली आहे ते **कोच**, किंवा जिला **पाणीकोच** म्हणतात ती भाषा बोलत असून, ते बहुतेक **ब्राह्मण**च बनले आहेत, असें म्हटलें तरी चालेल. किंबहुना, त्यांजवर **ब्राह्मणी** रीतीभातीचा विशेष संस्कार झाला आहे, असेंही म्हणण्यास हरकत नाहीं.

गेंगाणी भाषा.

**आका**, **नाग**, **लुशाई**, **आराकनी**, **ब्रह्मी**, **मोन**, **शान**, **चिनी**, **जपानी**, व **कारेन**, इत्यादि भाषा प्रत्यक्ष **हिंदुस्थानांत**च प्रचारांत नसल्या कारणानें, त्यांजविषयीं जास्त विवेचन करण्याचें येथें प्रयोजन नाहीं. तथापि, या ठिकाणीं इतकें मात्र अवश्य सांगितलें पाहिजे कीं, सदरहू सर्व भाषा **गेंगाणी** किंवा **गुंजारव** वर्गांतल्या, असून, तत्संबंधानें जरूर तें दिग्दर्शन पूर्वीं केलेलें आहे.

तुर्की

**तुर्की** भाषा बोलणारे लोक **हिंदुस्थानांत** फारच थोडे आहेत. त्यांची मुख्य वस्ती ह्मटली ह्मणजे **मुंबई** किंवा दक्षिण **हैदराबाद**, या ठिकाणीं होय.

आरबी.

**आरबी** भाषेचें मथक **एडन्** असून, ती **निजामच्या** राज्यांत **हैदराबादे**स, लष्करी फौजेंत, व तैनाती चपराशी वर्गांत, तुरळक प्रचारांत आहे.

हीब्र्यु.

**हीब्र्यु** भाषा बोलणारे **ज्यू** फक्त **कोचीन** मध्यें मात्र आहेत. कारण, इकडील ज्यू ज्या त्या देशांतील रिवाजाप्रमाणें **मराठी, हिन्दी,** किंवा **मल्याळी** भाषा बोलतात.

आतां, **प्राकृत** भाषांचा कसकसा प्रसार होत गेला हें प्रथम सांगून, त्यांचें थोडक्यांत वर्गीकरण करतों.

प्राकृत भाषांचा प्रसार.

ह्या **भरतखंडांत,** आमच्या **आर्यपूर्वजांचा** जसजसा व जिकडे जिकडे फैलाव होत गेला, तसतसा व तिकडे तिकडे, प्रथमतः **संस्कृताचा** आणि तदनंतर **प्राकृत** भाषांचा आपोआपच प्रसार होत चालला. प्रथमारंभीं ह्यांनीं क्रमाक्रमानें **उत्तरहिंदुस्थानच** व्यापून टाकिलें असून, तदनंतर कालान्तरानें कांहींचा शिरकाव दक्षिणेकडे **सिंधू**-नदीनें, व बाकीच्यांचा **विंध्याचलाच्या** खिंडींतून झाला असल्याचें दिसतें.

पुढें, देशान्तर झाल्या कारणानें, ह्या **प्राकृत** भाषांत सहजींच अंतर पडत गेलें. त्यामुळें, देशस्थितीस अनुसरून, ह्या प्रत्येकीची व्याप्ति जास्त विसृत न होतां, ती भिन्न भिन्न ठिकाणीं केवळ मर्यादित प्रदेशांतच होऊं लागली. आणि कालेंकरून त्यांत बराच फेरफार झाल्यानें, त्या केवळ प्रांतिक भाषाच बनल्या.

देशी भाषांची व्याप्ति.

अशा प्रकारें, भिन्न भिन्न देशीभाषांत, हे जे नानातऱ्हेचे फेरफार होत गेले, त्यासंबंधाची मीमांसा अनेक प्राक्कालीन भारतीय विद्वानांनीं केली आहे. तथापि, त्या सर्वांत पौराणत्वाच्या संबंधानें **वररुचि** हाच अग्रणी होय.

देशी भाषेंतील वैय्याकरणी, आणि वररुचि.

हा सुप्रसिद्ध भाषाशास्त्रज्ञ व नामांकित **प्राकृत** वैय्याकरणी, इ. स. पूर्वी पहिल्या शतकांत होऊन गेला असून, त्यानें एकंदर **प्राकृतभाषांचे** चार[1] वर्ग केले आहेत. **१ महाराष्ट्री, २ शौरशेनी, ३ मागधी,** आणि **४ पैशाची. महाराष्ट्री** ही सांप्रतची **मराठीच** भाषा होय. **शौरसेनी** ही हल्लीं प्रचारांत असलेली वायव्य प्रांतातली ब्रिजभाषा आहे,

प्राकृत भाषांचे चार वर्ग

त्या प्रत्येकाची व्याप्ति.

---

१ ह्याखेरीज आणखीही दुसरे प्रकार आहेत. मागें पान १४१ पहा.

असें म्हणण्यास हरकत नाही. **मागधी** तर हल्लींची **बिहारी** भाषाच समजावयाची. आणि **पैशाची** ह्मणजे **हिमालया**पासून तों तहत **कन्याकुमारिका** नामक भूशिरापर्यंत, व **हिंदुकूश** पर्वतापासून तों **नीग्रेस** टोंकापर्यंत, अजूबाजूच्या प्रांतांत सुरू असलेली **अनार्य** लोकांची भाषा होय.

अपभ्रंशभाषा.

आतां, **अपभ्रंश**भाषेविषयीं मात्र थोडेसें दिग्दर्शन करणें राहिलें आहे. सबब, त्या संबंधानें दोन शब्द येथें लिहितों. केवळ भाषेच्या दृष्टीनेंच पाहिलें ह्मणजे, **अपभ्रंश** ही शेवटल्या वर्गाची भाषा आहे असें समजून, तिची विल्हेवारी लावण्यांत येते. कारण, **गोंवाळी** वगैरे लोक जी भाषा बोलतात, तिलाच " **अपभ्रंश** " अशी संज्ञा आहे. तथापि, शास्त्रदृष्टीनें एतद्विषयक विचार केला तर, **संस्कृता**शिवाय बाकी राहिलेल्या इतर सर्व भाषा **अपभ्रंशां**तच गणल्या जातात, असें भाषाभिज्ञांचें मत आहे. या बद्दलचा आधार **काव्यादर्शांत** खालीं लिहिल्याप्रमाणें आढळून येतो.

**आभीरादिगिरः काव्येष्वपभ्रंश इतिस्मृताः ।**
**शास्त्रेषुसंस्कृतादन्यदपभ्रंशतयोदितम् ॥**

( परिच्छेद १ ला. श्लोक ३६ वा. )

**प्राकृत** किंवा प्रचारांत असलेल्या देशी भाषांचें जें

प्राकृत भाषांचें प्रांतिक आणि शाब्दिक वर्गीकरण.

सदरीं दाखल केलेलें प्रांतिक वर्गीकरण दिलें आहे, त्याशिवाय कित्येक हिंदु वैय्याकरणांनीं आणखी शाब्दिक वर्गीकरणही केलें आहे. म्हणजे, भाषाकोषांतील शब्दतत्त्वास अनुसरून, त्या शब्दांचे त्यांनीं तीन वर्ग पाडले आहेत; व ते १ **तद्भव**, २ **तत्सम**, आणि ३ **देशज**, या प्रकारांनीं दाखविले आहेत. **संस्कृतापासून** झालेले ते **तद्भव** शब्द होत. संस्कृतासारखे असलेले ते **तत्सम** शब्द होत. व इतर रीतीनें स्वयमेव बनलेले, किंवा स्वदेशोद्भव असलेले **देशज** शब्द होत.

बौद्ध धर्मामुळें, प्राकृत भाषांस प्रोत्साहन.

**बौद्ध** धर्माचा फैलाव आणि **प्राकृत** भाषांचा उदयकाळ, हीं बहुतेक समकालीनच होतीं, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. किंबहुना, **बौद्ध** धर्माच्या प्रसारामुळेंच **प्राकृत** भाषांस विशेष प्रोत्साहन मिळालें, असेंही म्हटलें असतां चालेल. कारण, धर्माच्या संबंधानें सर्व प्रजाजनांस जो उपदेश करावयाचा तो धर्मोपदेशकांनीं ठिकठिकाणीं चालत असलेल्या ज्या त्या प्रांतांतल्या देशी भाषेंतच केला पाहिजे; इतकेंच नव्हे तर **बौद्ध** धर्माचा फैलाव होण्याला मुख्यत्वें करून देशीभाषाच कारणीभूत होत, अशाबद्दल **बौद्ध** धर्माचा प्रवर्तक जो **गौतमबुद्ध** त्याचा मोठा कटाक्ष असे.

आणि ह्याचा मूळ हेतु म्हणून इतकाच कीं, एकंदर सर्व लोकांस, किंवा निदान बहुजनसमाजास तरी, धर्माचीं मूलतत्त्वें आपापल्या भाषेंत जितकीं सुलभ रीतीनें समजतात, तितकीं अन्य भाषेंत समजण्याची मोठी पंचाईत पडते. यासाठीं, धर्मोपदेशकांनीं धर्मसंबंधीं उपदेश करते वेळीं, **संस्कृताच्या** ऐवजीं **प्राकृत** किंवा **देशी** भाषांचाच उपयोग करण्याविषयीं, प्रथमतः **गौतमानें** व तदनन्तर **अशोक** बादशहानें दीर्घप्रयत्न केला होता.

मागधीचा फैलाव.

अशोकाच्या वेळीं **मागधीभाषा** प्रचारांत असून, ती **बहार** प्रांतांत सुरू होती. सबब, त्याच भाषेंत **बौद्धधर्माचीं** मतें फैलावलीं जाऊन, त्याचा प्रसारही थेट **सिंहलद्वीपा**-पर्यंत झाला. पुढें, ह्याच भाषेला "**पाली**" अशी संज्ञा

पाली व तिची पवित्रता.

पडून, तिची पवित्रभाषेंत गणना होऊं लागली. कारण, "**पाली**" शब्दाचा मूळ अर्थ आवलि, किंवा ओळ, अथवा रांग, असा होत असून, **बौद्ध** धर्माचीं पुस्तकें ह्याच भाषेंत लिहिण्याचा प्रसार पडत गेल्यानें, ती आपोआपच पवित्र भाषा बनली.

आतां, **जैन लोकांनीं** आपलीं धर्मपुस्तकें **महा-**

महाराष्ट्री व तिचा प्रसार.

**राष्ट्र** भाषेंत लिहून प्रसिद्ध करण्याचा एकसारखा सपाटाच ला-

विला होता. त्यामुळें, ह्या भाषेचा देखील विशेष प्रसार झाला, आणि पश्चिमहिंदुस्थानांत तीच भाषा वरचढ होऊन राहिली.

याप्रमाणें, इ० स० पूर्वीं आणि तदनंतर प्रथमारंभीं, किंबहुना बहुतेक पूर्वार्धांत, **मागधी** आणि **महाराष्ट्री** या दोनच प्राकृत भाषा प्रमुखस्थानीं असून, त्याच म्हणण्यासारख्या थोड्याबहूत नांवारूपास आल्या होत्या, असें ह्मणण्यास कांहींएक प्रत्यवाय दिसत नाहीं.

हिंदुस्थानांतील आर्य व अनार्य शाखांचा तपशील.

असो. **हिंदुस्थानांत** पौरस्त्य किंवा पाश्चात्य देशांतील ज्या **आर्य** अथवा **अनार्य** भाषांच्या शाखा आपल्या आढळण्यांत येतात, त्यांचा तपशील आणि खुलासेवार वर्गीकरण याखालीं देतों:—

हिंदी आर्य.

**१. हिंदि-आर्य**—यांत एकंदर लोकसंख्येच्या मानानें दर दहा हजारांत, हिंदी ३,२६७; बंगाली १,९७८; मराठी ७२१; पंजाबी ६७६; गुजराथी ४०९; उरीय ३४४; ऊर्दु १४०; सिन्धी ९९; पाश्चात्य पाहाडी ९८; आसामी ९९; मध्यपाहाडी ४४; मारवाडी ४४; कच्छी १७; हळबी ६; काश्मीरी १; गोवेंकरी १; पौरस्त्य पाहाडी १; आणि इतर किरकोळ भाषा १; मिळून दर दहा हजारीं ७,४६० लोकसंख्या सदरीं नमुद केलेल्या वर्गवारींतली होत आहे.

द्राविड.

२. **द्राविड**—यांत तेलगू ७५९; तामलि ५८१; कानडी ३७१; मल्याळी २०७; गोन्द ५३; तुलू १९; आरौन १४; कन्ध १२; कोद्गू २; माळपाहाडी १; ब्राहुई १; इतर १; मिळून २,०२१ आहेत.

कुलाली.

३. **कुलाली**—यांत संताळ ६५; मुंडा, व कोळ २५; कोरवा, आणि कूर ७; भलि ६; सावर ४; खारिया ३; बैग, भिंज, इत्यादि २; व गडब १; मिळून ११३ आहेत.

कैकाडी भाषा.

४. **परिभ्रमण** करणाऱ्या लोकांच्या भाषा—यांची संख्या दर दहा हजारीं १५ आहे. यांत वणजारी, लमाण, वडारी, कैकाडी, आणि रामोशी, इत्यादींचा समावेश होतो.

५. **खासीभाषा**—ह्या सर्व **खासी** भाषांत दर दहा हजारांत ७ इसम ती भाषा बोलणारे आहेत.

तिबेटी ब्रह्मी भाषा.

६. **त्रिविष्टप-ब्रह्मी**—यांत ब्रह्मी २१२; आराकनी १४; कचारी ८; नेपाळी ७; गारो ६; तिप्पर ५; खीण ५; नागांची भाषा ४; मिकीर४; मेच ४; काथे (मणिपुरी) ३; मिरीआबोर १; कूकी१; लालूंग १; लुशाई१; तिबेटी १; व इतर१, मिळून एकंदर २७८ आहेत.

मोन.

७. **मोन आनाम**; मोनतळइंग ९.

शान. ८. शान. यांची संख्या ७ आहे.

सिनी. ९. सिनी-यांत कारेन २६; आणि चिनी १; मिळून २७ आहेत.

१० इराणी आर्य-यांत पखतू ४१; बलूची ९; आणि इराणी १; मिळून एकंदर

इराणी. ५१; आहेत.

११. शमी-यांत आरबी २ आहेत. हिब्र्यू (इस्रा-

शमी. यल) भाषेचा यांतच समावेश होतो, परंतु तिची संख्या समजत नाहीं.

यूरोपस्थआर्य- १२ यूरोपस्थ-आर्य-यांत इंग्रजी ९ आहेत. आणि

बास्क व हामी. १३. बास्क व हामी मिळून १ आहे.

यूरोपखंडांतील ज्या भाषा हिंदुस्थानांत प्रचारांत

यूरोपखंडांतील भाषांची वर्गवारी. आहेत, त्यांची वर्गवारी व त्या बोलणारांची संख्या खालीं लिहिल्याप्रमाणें आहे:—

१ टयुटॉनिक—यांत इंग्रजी २,३८,४९९; जर्मन

टयुटॉनिक. २,२१५; डच्च ११९; व फ्लेमिश २२ आहेत.

२ स्कॉण्डिनेव्हियन्—यांत डॅनिश ९४; स्वीडिश

स्कांडिनेव्हियन्. १८७; व नॉर्वेजियन १९२ आहेत.

३ सेल्टिक—यांत वेल्श २४९; गॉलिक २६४; ऐरिश २९९; आणि सेल्टिक २; याप्रमाणें आहेत.
सेल्टिक.

४ भूमध्यसमुद्रवर्त्ती—यांत ग्रीक ३८०; लाटिन १; इतालियन् ६९०; माल्टीज ३२; रुमानी २२; स्पानिश १९९; व फ्रेंच २,१७१; आहेत.
भूमध्यडमुद्रवर्ती, व

५ स्ल्याव्हॉनिक—यांत रूस ९९; पोलिश ४६; झेच १; बल्गेरिअन् ४९; स्ल्याव्हॉनिक १; आणि बास्क १; असें असल्याचें कळून येतें.
स्ल्याव्हॉनिक.

याप्रमाणें भिन्नभिन्न भाषा बोलणाऱ्या **यूरोपस्थांची** एकंदर संख्या २,४९,७४६ आहे.

असो. येथपर्यंत, **भरतखंडांत** प्रचारांत असलेल्या मुख्य भाषांचें अवश्य तितकें दिग्दर्शन केलें असून, राहिलेल्या **शमी** आणि **तुराणी** शाखांत, **हीब्र्यु**, **आरबी**, आणि **तुर्की** भाषा, इत्यादींचा समावेश होतो.
शमीभाषेचें वर्गीकरण.

आतां, एकंदर लोकसंख्येच्या मानानें, **हिन्दी–आर्य**

आर्यहिंदीचा प्रसार.

भाषा २०,७७,३१,७२७ लोकांत, किंवा तीन चतुर्थांश लोकसमुदायांत प्राचारांत आहे.

द्राविडभाषेचा प्रसार.

**द्राविडभाषा** किंवा तिचे पोटभेद बोलणारांची संख्या सुमारें पांच कोटीवर, किंवा सरासरीनें एकंदर लोकसंख्येच्या एकपंचमांशा जवळ जवळ येईल. हींत **ब्राहुई**, **सिंहली**, आणि **महाली**[1], या भाषांचा समावेश होतो, असें समजावयाचें.

कुलालीचा प्रसार.

**कुलाली** भाषा पश्चिम **बंगालयांत**, आणि **मध्यहिंदुस्थानांत** प्रचारांत असून, त्यांची संख्या अजमासें अठावीस लक्ष, किंवा एकंदर लोकसंख्येंत शेंकडा एक, यामानानें होईल असें वाटतें.

खासी आणि कैकाडी भाषांचा प्रसार.

**आसामच्या** दरींत **खासी** आणि **जयन्ती** नांवाच्या ज्या दोन टेंकड्या आहेत, त्यांत **खासी** नामक भाषा बोलतात. ह्या भाषेचे लेख नसून, तिचा **आर्यकुटुंबाशीं** देखील कांहीं एक संबंध नाहीं. हिचे तीन पोटभेद आहेत, व ही बोलणारांची संख्या सुमारें १,७८,००० आहे. **वण-**

---

१ ही भाषा **मिनिकोई** बेटांतले लोक बोलत असून, तें बेट मालदिव आणि लकदिव यां द्वीपसमुदायांच्या दरम्यान आहे.

**जारी** आणि **लमाण** लोक कांहीं निराळीच भाषा बोलतात; आणि **हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत** सर्व **हिंदुस्थानभर** फिरून, ते मालाची नेआण करितात, व त्याजवरच आपला उदरनिर्वाहा चालवितात. ह्यांची एकंदर संख्या सुमारें ४,००,००० होईल. यांशिवाय, **वडारी, वैदू, कैकाडी,** आणि **रामोशी,** इत्यादि लोकांचाही भटकणाऱ्या जातींतच समावेश होत असून, ते भिन्नभिन्न प्रकारची भाषा बोलतात. परंतु, ते ज्या ज्या ठिकाणीं हिंडतात, त्या त्या ठिकाणच्या भाषेची तींत भिसळ झाल्याचें भासतें. ह्मणजे **उत्तर हिंदुस्थानांत,** तींत अनेक जंगली भाषांचें व **हिंदीचें** मिश्रण असून, **मध्यहिंदुस्थानांत,** तींत **मराठी** व **हिंदी** या मिश्रित झाल्याचें दिसतें. आणि **दक्षिण** हिंदुस्थानांत, **तेलगू** व **मराठीचीच** सेळभिसळ त्यांत दृष्टीस पडते.

तिबेटी-ब्रह्मीचे पोटभेद, व त्यांचा प्रसार.

**त्रिविष्टप-ब्रह्मी** भाषेचे तीन पोटभेद आहेत. १ **ताई** किंवा **शान,** २ **मोन,** आणि ३ **कारेन.** पूर्वेकडील **आसाम** व थोडा **ब्रह्मदेशांतील** भाग, येथें **ताई** भाषा बोलतात; परंतु त्याच्याच सरहद्दीवरील लहान लहान संस्थानांत आणि **सायामच्या** राज्यांत, **शान** लोकांची बरीच वस्ती आहे. खालचा **ब्रह्मदेश,** वरच्या **ब्रह्मदेशाची** सरहद्द, **अनाम,** आणि **कंबोडिया,**

येथें मोन भाषाच बोलण्याचा विशेष प्रघात आहे. कारेन् भाषा चिनीभाषेशीं साम्य पावत असल्याचें भाषाभिज्ञांचें मत आहे, व ती विशेषतः खालच्या ब्रह्मदेशांतच लोक बोलतात. भरतखंडांत जपानी भाषा बोलणारा एकही नाहीं. टिनासरिम्च्या दक्षिणेस मरगुई नामक जो द्वीपसमूह आहे, त्यांत कांहीं दर्यावर्दी कैकाडी लोक आहेत; आणि ते मल्याळी भाषा बोलतात. ह्या भटकणाऱ्या लोकांस सालोन अशी संज्ञा आहे.

द्रविड भाषा, व तिचे पोटभेद.

१ द्राविड भाषेचे खालीं लिहिलेले पोट भेद आहेत. १ तामिल. २ मल्याळी. ३ तेलगु. ४ कानडी. ५ बदग. ६ तुलू. ७ कुडुगू, किंवा कुर्ग. ८ तोड. ९ कोट. १० गोंड भाषेचे प्रकार. ११ महादेव. १२ राज. १३ मारिआ. १४ कन्ध अथवा कू. १५ उरौं, किंवा धनगर. १६ राजमहाली, अथवा मालेर. १७ दुसऱ्या किरकोळ भाषा. १८ नायकुडे. १९ कोलमी. २० कैकाडी. २१ येरूकल. आणि २२ गडब.

कलाल भाषा व तिचे पोटभेद.

२ कुलाल भाषेचे थोडेच भेद आहेत, ते असे. १ संताळी. २ मुंडारी. ३ हो, किंवा लर्ककोळ. ४ भूमिज. ५ कोर्वा. ६ खारिआ. ८ जुआंग. ९ कुरी, १० मेहतो. आणि ११ सवर.

३ त्रिविष्टप ( किंवा तिबेटी ) ब्रह्मी भाषेचे पुष्कळच पोट भेद आहेत, व तेही येथें सांगतों. १ काचारी, किंवा बोडो. २ मेच. ३ होजाई. ४ गारो. ५ पाणीकोच. ६ देवरी छुटा, ७ तिपूर, अथवा म्रुंग. ८ तिबेटी, किंवा भुतीया. ९ सर्प. १० ल्होप, अथवा भुतानी. ११ च्छांगलो. १२ ट्वांग. १३ गुरुंग. १३ मुर्मी. १४ थाक्स्य. १५ नेवार. १६ पाहाडी. १७ मगर. १७ लेपचा १९ डपळा. २० मिरी. २१ अबर. २२ लो-भूतिया. २३ आका. २४ ( मिश्मीभाषा ). २५ चूलिकट. २६ तेयिंग, अथवा डिगरू. २७ मिञ्जू. २८ ढिमळ. २९ कनावरी भाषा. ३० मिछ्छन. ३१ तिबरस्कद. ३२ सुनचु. ३३ किरन्ती ३४ लिंबू. ३५ सुण्वार. ३६ ब्राम्रू. ३७ चेपंग. ३८ वायू. ३९ कुसुन्द. ४० नाग भाषा. ४१ नामसंग किंवा कैपुरिआ. ४२ बणपाडा, अथवा फोत्रोका. ४३ मिथन. ४४ तबलुंग. ४५ मुळुंग. ४६ खारी. ४७ नौगाव. ४८ तेंगुम. ४९ ल्होटा. ५० अंगामी. ५१ रेंगम. ५२ अरुंग. ५३ कुच्छा. ५४ लियंग, किंवा करेंग. ५५ मराम. ५६ मिकिर. ५७ सिंगफो. ५८ जिली. ५९ ब्रह्मी. ६० ( कुकी भाषा ) खेंग. ६१ थाडो. ६२ लुशाई. ६३ हल्लमी. ६४ माणिपुरी. ६५ मरिंग. ६६ खोईबू. ६७ कुपुई. ६८ तंगखूळ. ६९

तिबेटी ब्रह्मी भाषा, व तिचे पोटभेद.

लुहूपा. ७० खुंगुई. ७१ फडंग. ७२ चंफुंग. ७३ कुपोमे. ७४ तकैमी. ७५ अन्द्रो व सेंगमाई. ७६ चढैरेल. ७७ अनल आणि नामफाऊ. ७८ कुमी. ७९ कमी. ८० म्रू. ८१ बंजोगी अथवा लुंगखे. ८२ पंकहो. ८३ शेण्डू किंवा पोई. ८४ सक. ८५ क्याऊ. ८६ (कारेनभाषा) स्गाऊ. ८७ बघाई. ८८ रक्त कारेन. ८९ प्वो. ९० तरू. ९१ मोपद्या. ९२ काय, अथवा गेकहो. ९३ तौंगधू. ९४ लिसाव. ९५ ग्यारुंग. ९६ तक्पा. ९७ मन्याक. ९८ थोचू. ९९ होर्पा. १०० खासी. १०१ ताई. १०२ शुंभ (किंवा सायामी भाषा, अथवा थाई). १०३ लाव. १०४ शान. १०५ अहोम. १०६ खमटी. १०७ ऐतोन. १०८ ताईमाहू, किंवा चिनीशान. १०९ मोनआनाम. ११० मोन. १११ कंबोजी. ११२ अनामी. आणि ११३ पलौंग.

# भाग ५६ वा.

## अनार्य भाषांविषयीं सामान्य निरूपण.

अनार्य भाषांचें विवेचन

**आर्य** भाषांनंतर **अनार्य** भाषांविषयीं थोडीशी तरी माहिती देणें फारच अवश्यकतेचें आहे असें समजून, ती या भागांत देण्याचा विचार केला आहे.

अनार्य लोकांच्या इतिहासांतच अनार्य भाषेचाही अन्तर्भाव.

**अनार्य** लोकांच्या इतिहासांतच **अनार्य** भाषेचाही अन्तर्भाव झालेला असल्या कारणानें, हिची हकीकत द्यावयास लागलें कीं, त्यांचीही थोडीबहुत तरी माहिती सांगणें अगदीं भाग पडतें. यासाठीं, आणि प्रस्तुत विषयांचें योग्य विवेचन व्हावें म्हणून, एकंदर वस्तुस्थितिच वाचकांपुढें जशीच्या तशी ठेवून, तद्विषयक उपलब्ध असलेली माहिती आम्ही थोडक्यांत येथें देतों.

आर्य व अनार्यांतील भेद.

तथापि, सदरहू विवेचनाला सुरवात करण्यापूर्वीं, **आर्य** व **अनार्य** वर्गांत कशा प्रकारचा भेद आहे; तो आमचे पूवज मानीत होते किंवा नव्हते; मानीत असल्यास केव्हांपासून

आणि तो मानण्याला तरी कोणतें कारण झालें; इत्यादि गोष्टींचा प्रथम विचार करणें अगदीं जरूर आहे.

त्याचा मनुकालांतील उल्लेख.

आतां, सदरहू भेद फारच प्राचीन काळापासून चालत आल्याचें दिसतें. कारण, त्याचा स्पष्ट उल्लेख **मनुस्मृतींत** देखील केला आहे. प्रथमतः **दस्यु** म्हणजे कोण, याबद्दलचें सविस्तर विवेचन करण्यासाठीं **स्मृतिकार** असें लिहितात कीं, **ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य,** आणि **शूद्र,** यांजातींपैकीं जे कोणी क्रियाहीन असल्या कारणानें बहिष्कृत आहेत, मग ते **आर्यभाषा** बोलणारे असोत अथवा म्लेच्छ भाषा बोलणारे असोत, ते सर्व **दस्यू** होत. आणि हेच **दस्यू** निःसंशय **अनार्य** समजावयाचे.

**मुखबाहूरुपज्जानां यालोके जातयो बहिः ।**
**म्लेच्छवाचश्चार्यवाचःसर्वेते दस्यवःस्मृताः ॥ ४९ ॥**

( मनुस्मृतिः. दशमोध्यायः )

ह्यावरून, इतकें चांगलें व्यक्त होतें कीं, **आर्यांच्या** चालीरीतीस अनुसरून ज्यांची वर्तणूक नसे, किंवा ज्यांचा वर्तनक्रम **आर्यांस** बिलकुल संमत नसे, त्यांजलाच ते **आर्यवर्गा**बाहेरचे समजत, व **अनार्य** मानीत. किंबहुना, अमंगलता, निष्ठुरता, निष्क्रियता, आणि क्रूरता, इत्यादि गुणच **अनार्यांचे** द्योतक होत, असेंही म्हणण्यास कांहींएक प्रत्यवाय नाहीं.

अनार्यता निष्ठुरता क्रूरता निष्क्रियात्मता ।
पुरुषं व्यंजयन्तीह लोके कलुष योनिजम् ॥ ५८ ॥

( मनुस्मृतिः दशमोध्यायः ).

आतां, मनूचा काल इ० स० पूर्वी बाराशें वर्षे अस-

मनूचा काल.

ल्याविषयीं कित्येक शोधक पौरस्त्य भाषाभिज्ञांचें[1] मत असून, तो इ० स० पूर्वी नऊशें वर्षे असावा, असा कांहीं अर्वाचिन इतिहासकारांचा[2] अभिप्राय आहे. तथापि, तें कसेंही असलें तरी, हा स्मृतिकार विशेष प्राचीनकाळचा होता, यांत काडीमात्रही शंका नाहीं. आणि केवळ मनुस्मृतीवरूनच, आर्य व अनार्य यांच्या मधला भेद आज सुमारें तीन हजार वर्षांवर चालत आला असल्याचें उघड होतें. ऐवढेंच नाहीं तर, ह्याची मर्यादा याच्याहीपेक्षां जास्त पुरातन काळांत जाऊं पाहते. फार तर काय सांगावें पण, हा भेद मनुस्मृतीच्या पलीकडील कालांत देखील सर्वत्र प्रचारांत असून, अति प्राचीन वेदकालांत तर, तो अगदीं ज्यारीनें सुरू होता, असें स्पष्टपणें दिसून येतें.

कारण, आमची जी पुराणतम वेदकालीन सुधारणा,

---

१ सर विल्यमजोन्स. २ एल्फिन्स्टन.

भारतीय साम्राज्य. पूर्वार्ध. पुस्तक चवथें. भाग विसावा. पान ६।७

ऋक्‌कालांतील तद्विषयक दिग्दर्शन.

तिच्या केवळ बाल्यावस्थेंत सुद्धां, म्हणजे ऋक्‌संहितेच्या[1] आरंभींही, एतदविषयक स्पष्ट उल्लेख केलेला दृष्टीस पडतो. इतकेंच नव्हें तर, **आर्य** आणि **अनार्य** यांत अवश्य असा भेदाभेद करण्याविषयीं आमच्या पूर्वजांनीं आपली सर्व भीड प्रत्यक्ष देवादिकांसही खर्ची घातली असल्याचें चांगलें व्यक्त होतें.

एका ऋचेंत आमच्या पुराण **आर्यांनीं** असें म्हटलें आहे कीं,

विजानी ह्यार्यान्येच दस्यवो । ८ ।

(ऋ. १. मं. १ अ. १०. सू ५१.)

"हे इन्द्रा, आह्मी **आर्य**, आणि आर्येतर जे **दस्यु**, ह्यांच्यांतील भेदाकडे तुला लक्ष्य दिलें पाहिजे." ह्यावरून, **आर्य** व **अनार्य** यांच्यामधील भेद आणि स्थित्यंतर अति प्राचीनकाळापासूनच **आर्य**पिंडांत अगदीं खिळून राहिलें असल्याचें कोणाच्याही लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं. आणि, धर्माप्रमाणें आचरण न करणारास, **मनुकालांत** ज्याप्रमाणें बहिष्कृत मानीत, त्याच-

---

१ ऋक्‌संहितेचा काल इ. स पूर्वी सुमारें दहा हजार वर्षांवर असावा, असें वाटतें. भारतयि साम्राज्य. पूर्वार्ध. पुस्तक दुसरें. भाग दहावा. पान १६ पहा.

प्रमाणें **वैदिक कालां**त देखील कर्महीन मनुष्यास **अव्रत** समजत.

**बर्हिष्मतेरंधया शासदव्रतान् । ८ ।**

( ऋ. मं १. अ १०. सू. ५१. )

सदरहू विवेचनावरून **आर्य** आणि **अनार्य** यांच्यांतलि भेद कोणत्या कारणानें व केव्हांपासून प्रचारांत आला, हें सहजीं लक्षांत येतें. फार तर काय सांगावें पण त्यावरून आणखी दुसरीही एक महत्वाची गोष्ट चांगल्याप्रकारें व्यक्त होते. ती ही कीं, **आर्यांनीं अनार्य** अशी संज्ञा फक्त **धर्मभ्रष्ट**[1] लोकांसच लाविलेली असून, त्यायोगानें त्यांनीं ह्यांचें कर्महीनत्व मात्र सुचाविलें. परंतु, **आर्य** म्हणजे **जेते** व परमुलुखांतील लोक; आणि **अनार्य** ह्मणजे **जित** व **भरतखंडां**तील मुळची राहणारी प्रजा; किंवा **भरतवर्षां**तील आशिक्षित, जंगली, आणि कृष्णवर्णाचे लोक, असें मात्र समजण्याचें नाहीं. निदान, तसें **ऋग्वेदा**वरून अगर **मनुस्मृती**वरून तरी खचितच व्यक्त होत नाहीं.

अनार्य ह्मणचे धर्मभ्रष्ट व कर्महीन लोक.

**आर्यां**प्रमाणें ज्यांची राहण्याची पद्धति पवित्र नव्हती; अथवा जे अव्यवस्थित रीतीनें वागत; किंवा जे अमंगळपणाचें आचरण करीत; त्यांस आमचे **आर्यपूर्वज** अ-

आर्य ह्मणजे पवित्र आणि यज्ञयाग करणारे.

---

१ मागें पान २८ ते ३१ पहा.

**नार्य** मानीत; आणि ह्याच कारणासाठीं, त्यांनीं त्यांजला **दस्यु** असें नामधेय दिलें. तेव्हां अर्थातच, जे जे म्हणून अव्रत होते; अथवा जे जे कर्महीनसे त्यांजला वाटले; किंवा ज्यांचा आचार धर्मभ्रष्टसा दिसला; ते सर्व आपल्या कळपाबाहेरचे समजून, त्यांजला आमच्या पूर्वजांनीं **अनार्य** ठरविले.

अनार्यांत विदेशीयांचा अन्तर्भाव.

आतां, आम्हा **आर्यांची** ह्या **भरतखंडांतील** मुळची वस्ती दिवसानुदिवस जास्त होऊन ती पसरत गेल्यावर, इतर लोकांशीं देखील आमचा निकटसंबंध होत गेला असावा; आणि त्यामुळें, विदेशीयांचेंही **भरतखंडांत** आगमन झालें असावें; निदान इकडे येण्यास त्यांजला अवश्य ती सवड तरी मिळाली असावी, यांत शंका नाहीं. परंतु, त्यांचे आचारविचार आम्हां **आर्यांच्या** आचारविचारानुरूप नसल्याकारणानें, इतर कर्महीन लोकांबरोबर त्यांस देखील **अनार्य** अशी संज्ञा मिळून, ह्या सर्वांचा **अनार्यांत** समावेश होत गेला, असें अनुमान करण्यास बलवत्तर कारण मिळतें.

आर्य व अनार्यांविषयीं यूरोपस्थांची कल्पना.

तथापि, **यूरोपस्थ** पंडितांची एतद्विषयक अगदीं भिन्न कल्पना आहे; ते असें समजतात कीं, **आर्य** लोक हे **हिंदुस्थानांतले** मूळचे राहणारे नसून, त्यांनीं **मध्य आशियांतील पठारावरून वायव्य** दिशेनें **भरतखंडांत** आगमन केलें.

इतकेंच नव्हे तर, **आर्यांनीं** येथें प्रवेश करण्यापूर्वींच **अनार्यांनीं** संचार करून, त्यांनीं या देशांत आपलें कायमचें ठाणें करून ठेविलें होतें.

व त्यांचें भरत खंडांत आगमन.

आतां, हे **अनार्य** लोक **भरतखंडांत** कोणीकडून कसकसें उतरले, याविषयींचेंही येथेंच थोडेबहुत दिग्दर्शन केलें पाहिजे. एतद्विषयक **पाश्चात्यां**ची अशी कल्पना आहे कीं, **आर्य** लोक इकडे येण्यापूर्वींच **अनार्य** लोकांची टोळी या देशांत दोन मार्गांनीं शिरली असावी. एक १ **ईशान्य** दिशेनें, आणि दुसरी २ **वायव्य** दिशेनें. **त्रिविष्टप-ब्रह्मी** व **कुलाल** हे ईशान्य दिशेनें **हिंदुस्थानां**त आले असून, त्यांची वस्ती पूर्वेतिहासकालीं, **मध्य आशियां**त, **मोगली** आणि **चिनी** लोकांच्या पूर्वजांच्या सान्निध, केव्हां ना केव्हां तरी असावी. येवढेंच नव्हे तर, **आसामां**तील **नागा** जातीचे लोक ह्यांच वर्गांतील होत, असें ते समजतात. त्याचप्रमाणें, **अनार्य द्रविड** हे वायव्य दिशेनें **हिंदुस्थानांत** आले, व त्यांनीं हळू हळू हा देश व्यापून टाकिला. तदनंतर, कालान्तरानें सदरहू भिन्न भिन्न दिशेनें आलेल्या कुटुंबद्वयांची **मध्यप्रांतां**त कोठेंतरी गांठ पडून, चकमक उडाली. पुढें, तींत **द्राविडांची** सरशी झाली, आणि ही

१ हल्लींचें कोळी म्हणून म्हणविणारे कदाचित याच वर्गांतले असावेत!

संधी पाहूनच त्यांनीं **त्रिविष्टप-ब्रह्मी** व **कुलाल अनार्यांस** हांकलून लाविलें; आणि आपण पुढें दक्षिण दिशेकडे चालते झाले. त्यानंतर, हे पराभूत झालेले लोक ठिकठिकाणीं पांगले, व ज्याला जी वाट सुचली तिकडे तो गेला.

त्यासंबंधानें भाषाभिज्ञांचें मत.

याप्रमाणें, **अनार्य** लोक **भरतखंडांत** वायव्य आणि ईशान्य दिशेनें आले असल्याविषयीं कल्पना आहे; व ह्याचें येथें आगमन **वेद**कालापूर्वीं किंवा नंतर झालें असून, त्यांच्याबरोबरच त्यांच्या ( **अनार्य** भाषेचा ) प्रादुर्भाव झाला असल्याचें **पाश्चात्य** म्हणतात.

अनार्यांची द्राविड, कुलाल, व त्रिविष्टप अशी शाखा.

वायव्य दिशेकडून जे **अनार्य** आले, त्यांजला **द्राविड** अशी संज्ञा आहे. परंतु, ईशान्य दिशेकडून ज्या **अनार्यांनीं** प्रवेश केला, ते **कुलाल** शाखेंतील असून, त्यांचा आणि **द्राविड अनार्यांचा** साम्ना **मध्यहिंदुस्थानांत** कोठें तरी झाला असल्याची **पाश्चात्यांची** कल्पना आहे. असो. ह्याशिवाय, उत्तरेकडून देखील कांहीं **अनार्य** लोक आले होते, अशी त्यांची समज आहे. सबब, त्यांचाही आणखी एक निराळाच वर्ग पाडून, त्यांजला **त्रिविष्टप** ( तिबेटी ) **ब्रह्मी** अशी संज्ञा दिली. तथापि,

१ Dr. Hunter's Indian Empire. P. P. 326/327.

कालान्तरानें, केवळ **कुलाल** वर्गांतच ह्यांचा अन्तर्भाव होत गेल्यानें, ह्या दोन्ही शाखा पुढें एकवटल्या.

आर्यांच्या आगमनानें अनार्यांचा लोप; व त्यांचें ठिकठिकाणीं पर्यटन.

मिळून, **द्रविड–अनार्य** आणि **कुलाल–अनार्य**, या नांवाच्या शाखा, **भरतखंडांत** वायव्य आणि ईशान्य दिशेनें अनुक्रमानें शिरल्या; व त्यांची भाषा थोड्याबहुत प्रमाणानें येथेंच फैलावत गेली. तद्‌नंतर, त्यांच्या मागून, **आर्यजेत्यांच्या** झुंडीच्या झुंडी वायव्य दिशेनें **आर्यावर्तां**त दाखल झाल्या, आणि शनैः शनैः त्यांनीं हें अखिल **भरतखंड** व्यापून टाकून, केवळ आपल्या बाहुबलानें तें पादाक्रान्तही केलें. त्यामुळें, **अनार्य** लोकांस आपला काटशह काढणें अगदीं भाग पडलें, व आपण हतवीर्य झाल्याचें पाहून त्यांनींही आपला हळू हळू गाशा गुंडाळला. पुढें ते दाही दिशांस फांकले, आणि ज्याला जी वाट सुचली, ती त्यानें पकडली. त्याकारणानें, कांहीं पूर्वेस, व पश्चिमेस; आणि कांहीं उत्तरेस, व दक्षिणेस, याप्रमाणें पांगले जाऊन, त्यांनीं ज्या त्या दिशेस आपले तळ दिले; अशी कित्येक **पाश्चात्य** विद्वानांची समजूत आहे.

पूर्वेस.

पूर्वेकडील भागांत, **जुआंग** व **संताळ** ह्या **अनार्य** लोकांनीं **ओरिसा** प्रांतांत वस्ती केली. **गोंड** आणि **मारी** लोक

मध्यप्रांतांत राहूं लागले. व **आका** लोकांनीं **आसाम**ची दिशा धरली.

पश्चिमेस. पश्चिमेस, **सिंध** प्रांताच्या सरहद्दीवरच, **ब्राहुई**[१] लोकांनीं आपलें वसतीस्थान बनविलें.

उत्तरेस. उत्तरेकडे, **कुलाल** व **तिबेट ब्रह्मी** हे हिमालयाच्या प्रांतभागीं व **धवलगिरी**वर संचार करूं लागले; आणि

व दक्षिणेस. दक्षिण दिशेला **कोंढ** लोकांनीं **गंजम** व **विजगापट्टणा**कडे आपला मोरचा फिरविला; व **द्रविड** लोकांनीं तर बहुतेक **मद्रास** इलाखाच व्यापून टाकला.

शंकेचा उद्भव. अशा प्रकारचें अनेक भाषाकोविदांचें आणि पाश्चात्य पंडितांचें मत आहे. परंतु, ह्यांतील खरें तत्व काय असावें, याविषयीं **डाक्तर हण्टर** सारख्या बहुश्रुत आणि विद्वान इतिहासकारासही अजून मोठा संशयच आहे.[१]

---

१ " Whence came these primitive peoples, whom the Aryan invaders found in the land more than 3,000 years ago, and who are still scattered over India , the fragments of a prehistoric world. "

( Dr. Sir, W. Hunter' Indian Empire.

Second Edition. P. 63. )

ह्याविषयींचें अवश्य तें विवेचन आम्हीं भारतीय साम्राज्याच्या सोळाव्या पुस्तकांत करण्याचें योजिलें आहे. ( ग्रंथकर्ता. )

परंतु, ह्या कल्पनेला सप्रमाण असा कांहींच आधार नाहीं. इतकेंच नव्हे तर, ह्या गोष्टीच्या प्रत्यन्तरास, कोणतेंही ऐतिहासिक प्रमाण नसून, अनुमान अथवा कल्पनाचातुर्याशिवाय, अन्य प्रत्यक्ष आणि मजबूत असें कोणत्याही प्रकारचें साधन उपलब्ध होत नाहीं, असें कोणालाही कबूल करणें भाग आहे.

तद्विषयक ऐतिहासिक प्रमाणशून्यता.

ह्या संबंधानें, एकंदर साधक बाधक कारणांचा सर्व बाजूंनीं विचार करतां, असें दिसून येतें कीं, आमच्या आर्यांपैकीं जे कोणी अव्रत राहिले, अथवा धर्मभ्रष्ट झाले, त्यांचा एक निराळाच कळप बनून, त्यास **अनार्य** ही संज्ञा प्राप्त झाली, व अतएव ते **अनार्य** वर्गांत मोडूं लागले; आणि त्यांच्या अनाचारामुळें, त्यांचें व आमचें क्षणभर देखील पटेनासें झाल्या कारणानें, ते आमच्या थाऱ्यासही उभे न राहतां, आपली वस्तीही अगदीं निराळीच करूं लागले. पुढें, कालान्तरानें, आमचा फैलाव जसजसा चोहोंकडे होत चालला, तसतसे ते जंगलांत गेले; व जेव्हां आमचीं ठाणीं रानावनांतही चमकूं लागलीं, तेव्हां ह्या **अनार्यांनीं** दरीकंदरीचा मार्ग सहजींच पकडला.

आर्यांची भ्रष्टता व त्यामुळें त्यांस प्राप्त झालेलें अनार्यत्व.

याप्रमाणें, हे **अनार्य** लोक आमच्या भीतीनें, निव्वळ

वनांत आणि डोंगराळ प्रदेशांतच सतत राहूं लागल्यामुळें, व अनेक शतकें, किंबहुना हजारों वर्षें, त्यांस सुधारणेचा गंधही न मिळाल्या कारणानें, ते केवळ आपोआपच रानटी बनले. इतकेंच नव्हें तर, कालान्तरानें त्यांच्यांतच भरतबाह्य देशांतील रानटी लोकांची भर पडून, त्यांची अगदीं पशुतुल्यच अवस्था होत जाऊन ते मनुष्य कोटीलाच मुकत चालले, असें तत्कालीन प्राचीन ग्रंथावलोकनानें, कोणाच्याही सहजीं लक्षांत येण्यासारिखें आहे.

अनार्यांचें बलहीनत्व. व त्यामुळें त्यांची सूड घेण्याची इच्छा.

असो. आमच्या पुढें ह्या **अनार्य** वर्गाचें कांहीं एक चालतनासें झाल्यानें, केवळ आमचा सूड उगविण्याच्याच हेतूनें, ते आपल्या दरीकंदरींतून वेळीं अवेळीं बाहेर पडून, आम्हांवर अकस्मात् छापा घालीत, आमचा हरतऱ्हेनें विध्वंस करण्यास प्रवृत्त होत; आणि आमचे यज्ञयाग यथासांग होण्यास नानाप्रकारची हरकत आणीत.

त्याचें ऋग्वेदांत दृष्टिगोचर होत असलेलें प्रमाण.

ह्या गोष्टीचें प्रत्यक्ष प्रमाण पाहणें असल्यास फार दूर जावयास नलगे. कारण, तें **ऋग्वेदांतच** ठायीं ठायीं व्यक्त होणारें आहे. ( मागें पान १९ ते ३२ पहा ).

आतां, ऋग्वेदानंतर दुसऱ्या शेजेचा पुराण ग्रंथ

म्हटला म्हणजे **रामायण** होय. सबब, आपण तिकडे क्षणभर वळूं, आणि त्यांत ह्या संबंधाचा कांहीं दाखला मिळाला तर पाहूं.

ह्यासंबंधानें रामायणांत उपलब्ध होत असलेला दाखला.

**खर** नांवाचा राक्षस **रावणा**चा भाऊ असल्याविषयीं **रामायणां**त एके ठिकाणीं सांगितलें असून, अशा प्रकारचे **अनार्य**, म्हणजे आचार व धर्मभ्रष्ट लोक, **तापसांचा** घात करण्यांतच विशेष आनंद मानीत असल्याबद्दलचेंही प्रसंगानुसार त्यांतच वर्णन केलें आहे, असें याखालीं नमूद केलेल्या अवतरणावरून वाचकांच्या लक्षांत येईल.

**रावणावरजः कश्चित् खरो नामेह राक्षसः ।**
**उत्पाटच तापसान् सर्वान् जनस्थाननिवासिनः॥ १२॥**
**धृष्टश्चाजितकाशीच नृशंसः पुरुषादकः ।**
**अवलिप्तश्च पापश्च त्वांचतात न मृष्यते ॥ १३ ॥**
**त्वंयदा प्रभृतिह्यस्मिन्नाश्रमेतातवर्तसे ।**
**तदा प्रभृति रक्षांसि विप्रकुर्वंति तापसान् ॥ १४ ॥**
**दर्शयन्ति हि बीभत्सैः क्रूरैर्भीषणकैरपि ।**
**नानारूपैर्विरूपैश्च रूपैरसुखदर्शनैः ॥ १५ ॥**
**अप्रशस्तैरशुचिभिः संप्रयुज्यच तापसान् ।**
**प्रतिघ्नंत्यपरान् क्षिप्रमनार्याः पुरतः स्थितान् ॥ १६ ॥**

तेषुतेष्वाश्रमस्थानेष्वबुधमवलीयच ।
रमन्ते तापसान्स्तत्र नाशयन्तोऽल्पचेतसः ॥ १७ ॥
अवक्षिपन्तिस्रुग्भांडानग्नीन्सिंचंतिवारिणा ।
कलशांश्च प्रमर्दन्ति हवने समुपस्थिते ॥ १८ ॥
( रामायण. २. ११६. ११. )

रावणाचें कुल.

सदरीं नमुद केलेला **खर** हा राक्षस असून, तो **रावणाचा** धाकटा भाऊ असल्याविषयीं पूर्वीं सांगितलेंच आहे. परंतु हा **रावण** कोण, तो कोणत्या कुळांत जन्मला,व त्याच्या बापाचें नांव काय, इत्यादींचें दिग्दर्शन झालेलें नसल्यामुळें, आणि विषयसंदर्भासाठीं तें करणें अवश्यकतेचें वाटल्यावरून, तत्संबंधीं थोडीशी हकीकत येथेंच देतों.

त्याचें आर्यत्व.

**रावण** हा **पुलस्ति** ऋषीचा नातू असून, त्याला त्याच कारणानें **पौलस्त्य**[1] ही म्हणण्याचा परिपाठ असल्याचें आढळून येतें. **विश्रवस्** हा **पुलस्तीचा** पुत्र व **रावणाचा** पिता होय, आणि त्याला **कुबेर, रावण, कुंभकर्ण, विभीषण, खर,** व **शूर्पणखा,** वगैरे प्रजा होती.

सदरहू **पुलस्त्य** ऋषि **आर्य** कुळांतील असून, त्याचा **पुत्र विश्रवस्** देखील त्याच कुळांत उत्पन्न झाला होता.

---

१ **पौलस्त्यः** कथमन्यदारहरणे दोषंन विज्ञातवान् ।

तेव्हां अर्थात्च, त्याची प्रजा ही **आर्य**कुटुंबांतील होती, असें मानण्यास बलवत्तर कारण मिळतें, आणि अन्य प्रकारची शंका घेण्यास सुद्धां अवकाशच राहत नाहीं.

त्याला राक्षसपद प्राप्त होण्याचें कारण.

अशा प्रकारची वस्तुस्थिति असूनही, सदरीं नमुद केलेल्या सहा भावंडांपैकीं, फक्त **रावण**, **कुंभकर्ण**, **खर**, व **शूर्पणखा**, इत्यादींस आणि त्यांच्या अनुयायिजनांसच **राक्षस**, असुर, व **अनार्य**, अशी जी संज्ञा पडली, त्याचें कारण हें कीं, ह्या सर्वांची बुद्धि दुष्ट असल्यामुळें, ते आचारभ्रष्ट होत चालले, आणि त्यांची नेकी बुडाल्या कारणानें, ते स्वेच्छाचारी बनून, पापकर्मांतही निमग्न होऊं लागले. त्यामुळें उघडच, **आर्य**वर्गांत त्यांची गणना न होतां, **असूर**, **राक्षस**, व **अनार्यां**तच त्यांचा समावेश त्यांच्या आचारानुरूप झाला, हें साहजिकच होय.

सदरहू राक्षसांची संस्कृत ही मायभाषा व त्यावरून त्यांचें आर्यत्व.

ह्या म्हणण्याच्या पुष्टीकरणार्थ आणखीही एक बलवत्तर दाखला मिळतो; आणि त्यावरून, **राक्षस** किंवा **असूर** म्हणून म्हणविणारे लोक, मुळचे **आर्य**कुटुंबांतलेच असावेत, असें अनुमान होतें. कारण, ते **संस्कृत** बोलत असत, व त्यावरून त्यांची जन्मभाषा देखील **संस्कृत**च असल्याचें दिसतें. इतकेंच नव्हें तर, ते **अनार्य** ( म्हणजे **पाश्चात्य** कल्पनेप्रमाणें ह्या देशांतले

मूळचे राहणारे रानटी लोक ) असते, तर त्यांजला **संस्कृत** येण्याचा संभवच नव्हता, हेंही उघड आहे.

त्या संबंधाचा दाखला.

**इल्वल** आणि **वातापि** नांवाच्या राक्षसांनीं ब्राह्मणांचें रूप धारण करून ते **संस्कृतांत** बोलत असल्याविषयीं, व **ब्राह्मणांस** निमंत्रण करून त्यांनीं त्यांस श्राद्धसंकल्पासही पाचारण केलें असल्याबद्दल,सर्वांस महशूर आहे. त्यावरून, **संस्कृत** ही त्यांच्या आंगवळणी पडलेली व प्रचारांतली भाषा होती, असें वाटतें; आणि **रामायणावरून** देखील तसेंच दिसतें. सबब, तत्संबंधीं ज्यास्त विवेचन न करितां, ह्या सुप्रसिद्ध महाकाव्यांतील अवश्य तें अवतरणच वाचकांच्या माहितीसाठीं येथें देतों.

**इहैकदाकिलक्रुरो वातापिरपिचेल्वलः ।**
**भ्रातरौसहितावास्तां ब्राह्मणघ्नौ महासुरौ ॥ ५६ ॥**
**धारयन् ब्राह्मणं रूपमिल्वलः संस्कृतं वदन् ।**
**आमन्त्रयतविप्रान्स श्राद्धमुद्दिश्यनिर्घृणः ॥ ५७ ॥**

(रामायण. ३. ११. ५५)

तात्पर्यार्थ.

यावरून, **रावणादि** राक्षस **आर्यवंशांतलेच** असून, केवळ त्यांच्या दुराचरणामुळेंच आह्मी त्यांजला आमच्या कळपाबाहेरचे समजत असूं. इतकेंच नव्हे तर, **आर्यधर्म, आर्यनीति, आर्यसौजन्य,** व **आर्याचरण,** यावि-

रुद्ध ज्यांनीं ज्यांनीं ह्मणून आपला वर्तनक्रम ठेविला, ते ते **आर्य**कुटुंबांतले असतांही, त्यांजला बहिष्कृत मानून त्यांची **अनार्यां**त गणना करण्यांत येत असे, हें उघड आहे.

ह्यासंबंधानें ऐतरेय ब्राह्मणांतील प्रमाण.

ह्याच्याच मुकाबल्यास, **ऐतरेय ब्राह्मणांत** सुध्दां आणखी एक बलवत्तर प्रमाण मिळतें; आणि त्यावरून, **दस्यू** किंवा राक्षस हे **विश्वामित्राचे** पुत्र असल्याचें होतें. मात्र, ते कालान्तरानें नितिभ्रष्ट होत गेले, व त्याच कारणानें त्यांजला **अनार्य** ही संज्ञा प्राप्त झाली, याविषयीं काडीमात्र देखील शंका नाहीं.

**ताननुव्याजहार । अन्तान्वः प्रजाभक्षिष्टेति ।**
**ते एते अन्ध्राः पुंड्राःशबराःपुलिंदामूतिबा इत्युदन्त्या**
**बहवो भवन्ति । वैश्वामित्रादस्यूनां भूयिष्ठाः ।**
(ऐ. ब्रा. ७. १८).

**तात्पर्यार्थः**—अवज्ञा करणाऱ्या आपल्या पन्नास पुत्रांस **विश्वामित्रानें** शाप दिला, आणि तो त्यांस ह्मणाला कीं, "तुमची प्रजा (**भरतखंडां**च्या) अत्यन्त व बाह्य प्रदेशांतच निवास करील." तेच **अन्ध्र, पुण्ड्र, शबर, पुलिन्द, मूतिब,** इत्यादि पर्यंतस्थ लोक होत. आणि बहुतेक दस्यूंची उत्पत्ति **विश्वामित्रा**पासूनच झालेली आहे.

ह्याखेरीज, **महाभारतांत ययाति** राजाचें जें कथा-

महाभारतांतील प्रमाण.

नक दिलें आहे, त्यावरून देखील अवज्ञा करणाऱ्या पुत्रास, अथवा नीति भ्रष्ट झालेल्या प्रजेसच, अनार्यत्व, यवनत्व, किंवा म्लेच्छत्व प्राप्त झाल्याचें दिसतें; व पुढें कालान्तरानें, ह्याच आचारभ्रष्ट प्रजेनें आपल्या सवडीप्रमाणें एका मागून एक असे ह्या भरतभूमीचे प्रांतभाग व्यापिले असल्याचें वाटतें.

ययाति राजाची गोष्ट.

ययाति राजाच्या पुत्रांनीं त्याचें वार्धक्य पत्करण्याचें नाकारल्यामुळें, त्यांस म्लेच्छत्व व यवनत्व प्राप्त होईल, म्हणून त्यानें शाप दिला; आणि तदनन्तर कालवशात्, तुर्वसू पासून यवन झाले; व अनु पासून म्लेच्छ निपजले.

यत्त्वंमेहृययाज्जातोवयः स्वंनप्रयच्छसि ।
तस्मात्प्रजासमुच्छेदंतुर्वसोतवयास्यति ॥
संकीर्णाचारधर्मेषु प्रतिलोमचरेषुच ।
पिशिताशिषु चान्त्येषु मूढराजा भविष्यसि ॥
गुरुदारप्रसक्तेषु तिर्यग्योनिगतेषुच ।
पशुधार्मिषु पापेषु म्लेच्छेषु त्वं भविष्यसि ॥

(महाभारत. १. ३४७८)

यदोस्तु यादवाजातास्तुर्वसोर्यवनाः स्मृताः ।
द्रुह्योः सुतास्तुवैभोजा अनोस्तु म्लेच्छजातयः ॥

(महाभारत. १. ३५३३).

सदरहू ययाति राजा नहुषाचा पुत्र असून, त्यानें

समुद्रवलयांकित असलेली पृथ्वी आपल्या बाहुबलानें जिंकली. इतकेंच नव्हे तर, त्यानें तिचे पांच भाग करून, ती आपल्या पुत्रांस वाटून दिली; आणि आग्नेयी दिशेकडे जें त्याचें राज्य होतें, त्याजवर त्यानें **तुर्वसूला** बसाविलें, इत्यादि कथाभाग **हरिवंशांत** उपलब्ध होतो.

सीमावर्ती राजे, व त्यांचें आर्यत्व.

शिवाय, ह्याच आधारावरून आणखीं असेंही कळून येतें कीं, **अक्रीड** हा **कुरुथामाचा** पुत्त असून, त्याला **पाण्डय, केरल, कोल,** व **चोल** असे पुत्र होते. आणि त्यांच्याच नांवानें ते ते देश अजूनही सुप्रासिध्द आहेत.

**सप्तद्विपां ययातिस्तु जित्वा पृथ्वीं ससागराम् ।**
**व्यभजत्पंचधाराजन् पुत्राणांनाहुषस्तदा ॥**
**दिशिदक्षिण पूर्वस्यां तुर्वसं मतिमान् प्रभूः ।**
***   *   *   *   न्ययोजत् ॥**

(हरिवंश. ३०. १६१६)

**कुरुथामादथाक्रीडश्चत्वारस्तस्य चात्मजाः ।**
**पांडयश्चकेरलश्चैवकोलश्चोलश्चपार्थिवः ॥**
**तेषांजनपदाः स्फीताः पांड्याश्चोलाः सकेरलाः ।**

(हरिवंश. ३२. १८३१.)

ह्याच्याच मुकाबल्यास आणखीही एक प्रत्यक्ष व प्रचारांतलें उदाहरण देतों. ह्मणजे त्यावरून, एकंदर वस्तुस्थिति वाचकाच्या लक्षांत येईल.

कंसाचें उदाहरण.

**कंस** हा **मथुरेचा** राजा असून, **कृष्णाचा** सख्खा मामा होता. **श्रीकृष्णभगवान्** ही **यदुकुलां**वतंस आणि **सोमवंशी** क्षत्रिय राजा असल्याचें सर्वांस महशूर आहे. तेव्हां, अर्थात्च, हे दोघेही राजे **आर्य** कुटुंबांतले होते, याजबद्दल तिळमात्र देखील शंका नाहीं. पण, असें असून सुद्धां, **कंसाला** केवळ त्याच्या क्रूरतेमुळें दैत्य व राक्षस मानीत; आणि ही गोष्ट आबालवृद्धांसही माहीत आहे.

त्याचप्रमाणें, ज्या कोणाचें वर्तन क्रूर, नीच, घातकी, आणि दुष्ट असेल, त्यास राक्षस किंवा दैत्य म्हणण्याचा अजून देखील आमच्यांत सर्वत्र परिपाठ आहे.

सारांश.

ह्यावरून, **राक्षस, यवन, म्लेच्छ, अनार्य,** इत्यादि वर्गांत मोडणारे **भरतखंडांतील** अतिप्राचीनकाळचे लोक व **प्रान्तनिवासी** राजे केवळ **आर्य**वंशजच असून, ज्यांनीं ज्यांनीं म्हणून **आर्यांचा** धर्म, त्यांचें सदाचरण, आणि त्यांची नीती सोडली, ते ते **भ्रष्ट** झालेसे मानून, त्यांजला आम्ही आमच्या कळपाबाहेरचे व अतएव **अनार्य** समजूं लागलों.

असो. **अनार्य** भाषेची सविस्तर हकीकत देण्यापूर्वीं **अनार्य** लोकांसंबंधीं अवश्य तितकें दिग्दर्शन सदरीं केलें आहे. सबब, आतां त्यांजबद्दलचा जास्त वृत्तान्त येथें देण्याचें प्रयोजन नाहीं. कारण तद्विशयक साद्यन्त इतिहास

भारतीय साम्राज्याच्या आठव्या पुस्तकांतील ४६ व ४८ व्या भागांत दिला असून, जरूर ती जास्त माहिती कोणा जिज्ञासूस पाहिजे असल्यास, ती तेथें मिळण्या सारखी आहे.

अनार्य भाषांतील पोट-भेदांविषयीं नूतन मत.

अनार्य भाषांत १ द्राविड, २ कुलाल, आणि ३ त्रिविष्टप-ब्रह्मी ( तिबेटी-ब्रह्मी ) यांचा समावेश करण्याविषयीं हल्लीं अगदीं नूतनमत प्रचारांत आहे. परंतु, द्राविडी लोक आर्यांपासून, व द्राविडी भाषा संकृतापासूनच[1] उद्भवलेली

1 ( Vide Muir's Sanskrit Texts. Vol. II. P. P, 225-493. )

"It is stated by a writer *in* the "Cornhill magazine" for Novr. 1871. P. 570, that Dr. Caldwell is wrong in asserting that the Dravidians are a Turanian people; and that in reality, they 'represent lineally an off-shoot from the great Parent stock which left the father land long before Sanskrit was grown into vigour, and about the same period that the Teutonic wave flowed north-wards into Europe. There is scarcely a Dravidian root which does not appear in Gothic, Anglo Saxon, or Icelandic."

ह्या संबंधानें रेव्हरंड, क्याल्डवेल हे आपल्या द्राविडी व्यां-करणांत अशाच प्रकारची कांहींची समज असल्याविषयीं उल्लेख करितात. तथापि, त्यांचें एतद्विषयक स्वतःचें मत अगदीं भिन्न आहे. कारण, अनार्य भाषेपासूनच द्राविडी भाषा उद्भवली अस-ल्याबद्दल त्यांनीं आपला अभिप्राय केवळ निखालस रीतीनेंच व्यक्त केला आहे.

(Vide The Dravidian Grammar. By the Rev. R. Caldwell B. A. Mission ) P. P. 28-38.

असल्याविषयीं कांहीं **पौरस्त्य** पंडितांचें मत असून, त्याचप्रमाणें कित्येक **पाश्चात्य** विद्वानांची देखील समजूत आहे.

तत्संबंधीं प्राचीन पौरस्त्य व पाश्चात्य मत.

आतां, निदान सकृत्दर्शनीं तरी **पौरस्त्यांचीं** अशा प्रकारची समज होणें अगदीं साहजीक आहे. कारण, ह्या **द्रविड** भाषेंत **संस्कृत** शब्दांचा पुष्कळ भरणा असून, त्यांनींच ही विशेष रीतीनें अलंकृत झालेली दिसते. इतकेंच नव्हे तर, पदलालित्य आणि अर्थगौरव साधण्यासाठीं, ह्या भाषेंत विशेषतः **संस्कृत** शब्दांचाच प्रत्यक्ष अगर पर्यायानें ज्यास्त उपयोग केल्याचें भासमान होतें. आणि कांहीं कांहीं ठिकाणीं, कित्येक शब्दांत, पुष्कळच अपभ्रंश झाल्यामुळें, जरी त्यांचें बरेंच स्थित्यन्तर झाल्यासारखें वाटतें, तरी कित्येक **संस्कृत** शब्द तर अगदीं हुबेहुब व जसेच्या तसेच तींत दृष्टीस पडतात.

तद्विषयक पहिलें आनुमानिक प्रमाण.

शिवाय, **द्राविड** भाषेंतील पौराणिक कथानकांत किंवा धर्मग्रंथांत, लौकिक विषयांत अथवा व्यवहारिक प्रचारांत, बहुतकरून **संस्कृत** शब्दच इतस्ततः मनसोक्त वापरलेले सांपडतात; व केवळ निरुपयास्तवच त्यांचा उपयोग करण्याचा प्रघात पडला असावा, असेंही सहजीं अनुमान होतें. कारण, हरएक प्रकारचा भाव आणि मनोगत व्यक्त करण्याचें जे कांहीं विलक्षण सामर्थ्य **संस्कृत** श-

ब्दांत आहे तें **द्राविडी** भाषेंत नसल्यामुळें, अथवा यथार्थ अवबोध होण्याची जी नैसर्गिक शक्ति **संस्कृत** शब्दांत आहे, ती **द्राविड** भाषेंतील शब्दांत नाहीं म्हणून, केवळ निरुपायास्तवच त्यांचा उपयोग करण्याचा प्रचार अगदीं ज्यारीनें सुरू झाला असावा, असें वाटतें. किंबहुना, तत्सदृश यथार्थ शब्द हींत उपलब्ध होत नसल्यानें, सर्वमान्य अशा संस्कृत शब्दांचेंच यथेष्ट अवलंबन करून त्यांचा हवातसा विनियोग विद्वज्जनांनीं आणि कविपुंगवांनीं केला असल्याचें उघड होतें.

दुसरें प्रमाण.

ह्या संबंधानें, आणखी दुसरी एक गोष्ट विशेष रीतीनें लक्षांत ठेवण्यासारखी आहे ती ही कीं, **द्राविड**, **तेलगू**, **तामिल**, **कानडी**, इत्यादि ज्या दक्षिणेकडील व्यावहारिक भाषा आहेत, व ज्या साधारणतः परिपक्क दशेप्रत पोहोंचलेल्या दिसतात, त्या इतक्या उन्नतावस्थेप्रत पावण्यास केवळ **आर्य**पंडितांचें साहाय आणि अनेक कविपुंगवांचें अश्रान्त परिश्रम, हीं विशेषेंकरून कारणीभूत झालीं आहेत. फारतर काय सांगावें पण, **संस्कृतभाषावधू**वर ज्याप्रमाणें अत्यन्त मनोहर दागिने चढलेले दिसतात, त्याचप्रमाणें सदरहू **प्राकृतभाषाकुमारिकां**वर अत्युज्ज्वल **रत्न मर**कत मण्यांचे नानाविध शृंगार घालून, त्यांस

ही अलंकृत करण्याचा भगीरथ प्रयत्न आर्य विद्वानां-कडूनच झाला असल्याचें भासमान होतें.

तिसरें प्रमाण.

तिसरी गोष्ट ही कीं, द्राविडी, तेलगू, तामिळ, इत्यादि भाषा अनार्य शाखेंतील असत्या तर, त्यांत अनार्य वर्गांपैकीं अनेक कविपुंगव होऊन, त्यांनींच त्यांचें विशेष संगोपन केलें असतें, व त्यास परिपक्व दशेप्रत पोहोंचून नांवारूपासही आणिलें असतें. परंतु, तसें झाल्याचें दिसत नाहीं. इतकेंच नव्हे तर, सदरहू भाषांतील सुप्रसिद्ध विद्वान आणि वैय्याकरणी, हे ब्राह्मणच असून, मोठमोठे कवी देखील द्विजवर्गांपैकींच आहेत. फार तर काय सांगावें पण, विद्येचें प्रत्येक अंग परिपक्व दशेप्रत आणण्याचें जडजोखमीचें आणि महत्वाचें काम ब्राह्मणांनींच आपल्या शिरावर घेऊन, तें उत्साहपूर्वक त्यांनींच शेवटास नेल्याचें, ह्या भाषांतील ग्रंथसंपत्तीवरून चांगलें व्यक्त होतें.

ह्या बाबतींत प्रोफेसर विलसनचें मत.

प्रोफेसर विलसनचें असें मत आहे कीं, संस्कृत भाषेची बरोबरी करण्याच्या लालसेनेंच ह्या दक्षिणेकडील भाषा परिपक्वतेस आणिल्याचें दिसतें. परंतु वस्तुतः, त्यांत कल्पकता ह्मणून काडीमात्रही नसून, केवळ संस्कृत ग्रंथांतील मजकूर अवतरण रूपानें अथवा भाषान्तर द्वारेंच सदरहू भाषांत सजवून, तो लोकांपुढें मांडला आहे. तथापि,

शब्दरचना व भाषेची ठेवण या संबंधानें पाहूं गेलें तर, ही **मांडण** केवळ **संस्कृत** भाषेचीच हुबेहूब नकल आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

व अन्य पाश्चात्यांचा अभिप्राय.

ह्या संबंधानें, दुसरे अनेक **पाश्चात्य** पंडितांचें देखील असेंच मत आहे. आणि ह्यापैकीं कित्येकांनीं तर **तामिल** भाषेचा उत्तम व्यासंग केलेला असल्यामुळें, त्या भाषेंत ते चांगलेच प्रवीण असून, त्यांचा अभिप्रायही विचारार्ह आहे. ते असें ह्मणतात कीं, **द्राविडी** भाषा **आर्यशाखे**पासूनच उत्पन्न झाल्याचें दिसतें. कारण त्यांत परस्पर अत्यंत सादृश्य आहे. इतकेंच नव्हें तर, **अनार्य** भाषांपासून त्या उद्भवल्या असल्याचें संभवतही नाहीं.

द्राविडी लोकांतील वर्ण व्यवस्था, व त्यावरून त्यांचें आर्यबीज.

आतां, **द्राविड** हे **अनार्य** नाहींत, व त्यांची भाषा सुद्धां **अनार्य** वर्गापैकीं नाहीं, असें मानण्यास दुसरें एक विशेष बलवत्तर कारण मिळतें. तें हें कीं, ज्याप्रमाणें आमच्या **आर्य**शाखेंत वर्णव्यवस्था आहे, त्याचप्रमाणें **द्राविडी** लोकांतही ती आहे. ह्मणजे **ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य,** आणि **शूद्र,** इत्यादि जातिभेद ते मानतात. ह्यावरून, ते आमच्या **आर्यपूर्वजां**च्या पिढींतलेच होत, यांत संशय नाहीं.

ह्या संबंधानें तद्देशीय लोकांचें देखील असेंच मत

त्याबद्दल त्या देशांतील एकंदर लोकमत,

असून, त्या देशांतील कित्येक समंजस, विद्वान, आणि व्युत्पन्न इगृस्थांबरोबर जो मी या बाबतींत स्वतः तपास केला, त्यावरूनही द्राविडीभाषा व द्राविडीलोक, हे आर्यशाखेपैकींच असल्याचें कळून येतें.

आणि ऐतीह्य व पारंपर्य.

याप्रमाणें पौरस्त्य आणि पाश्चात्य मत असून, त्यालाच अनुकूळ असें आमचें पारंपर्य व ऐतिह्य देखील आहे. सबब, ह्या सर्व गोष्टीस अजिबात विरजण घालणारा कांहीं विशेष प्रकारचा, मजबूत, व जोराचा पुरावा असल्याशिवाय, केवळ एकदेशीय अशा पाश्चात्य विचारतरंगांनींच त्या एके बाजूला ठेवितां येणार नाहींत, असें वाटतें.

तद्विरुद्ध रेव्हरंड कर्यॉल्डवेलचें मत.

आतां, द्राविडी भाषांत संस्कृत शब्दांचें प्राचुर्य असून, त्यांतील लेखनपद्धति आणि भाषाप्रचार हीं केवळ संस्कृतोद्भव दिसतात; इतकेंच नव्हें तर, त्यांतील बहुतेक उत्तम ग्रंथकार ब्राह्मणच आहेत, ही गोष्ट रेव्हरंड कर्यॉल्ड-

---

१ हे आपल्या द्राविडी व्याकरणांत असें म्हणतात कीं,

"Through the predominant influence of the religion of the Brahmans, the majority of words expressive of religious ideas which are in actual use in modern Tamil are of Sanskrit origin." * * *

( पुढें चालू. )

वेलास देखील कांहीं अंशानें कबूल आहे. तथापि, शब्दव्युत्पत्तिशास्त्रावरून द्राविडी, तामिळ, तेलगू, कानडी, मल्याळी, इत्यादि भाषा अनार्य शाखेंतील आहेत असें ते मानतात. परंतु, हें मत कित्येक शोधक पंडितांस देखील अगदीं संमत नाहीं, आणि ही गोष्ट ते सुद्धां निष्प्रांजलपणें कबूल करितात.

कारण, आपल्या द्राविडी व्याकरणांत, रेव्हरंड क्याल्डवेल हे स्पष्टपणें असें लिहितात कीं,

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

"In the other Dravidian languages, whatever be the nature of the composition or subjeet-matter treated of, the amount of Sanskrit which is employed is considrably larger than in Tamil, and the use of it has acquired more of the character of a necessity. This is in consequence of the literature of those languages having chiefly been cultivated by Brahmans. There is only one work of note in that lauguage which was not composed by a member of the sacred caste; and indeed the Telgu Sudras, who constitute *par excellence*, the Telgu people, seem almost entirely to have abandoned to the Brahmans the culture of their own language with every other branch of literature and Science."

( A comparative Grammar of Dravidian or South-Indian Family of languages. By the Rev. R, Caldwell. B, A. Missionary. P. 33. )

"Of late years, some inquirers have been inclined to question the relationship of the Dravidian languages to the Scythian, either in consequence of comparing them with the Tartar or Turkish languages alone, to the exclusion of the more allied Ugrian family or in consequence of observing in the Dravidian languages certain Indo-European affinities which seemed inconsistant with the Scythian theory. A friend of mine, *who is a good* Tamil *scholar was so much struck with the latter class* of analogies that he *was led to adopt the supposition of the* Indo-European *relationship* of the Dravidian tongues."

( A comparative grammar of the Dravidian or South-Indian Family of languages. By the Rev. R. Caldwell. B. A. P. P. 47-48 )

ह्यांतील इतालिक वर्ण आमचे आहेत. ( ग्रंथकर्ता.)

तद्द्विषयक शास्त्रीय विवेचनाची अवश्यकता.

असो. तें कसेंही असलें तरीं सदरहू भाषा आर्य आहेत किंवा अनार्य आहेत, याबद्दलचा आणखीही ज्यास्त उहापोह होणें फारच अवश्यकतेचें दिसतें. सबब, तत्संबंधीं एकंदर विवेचन चांगल्या मजबूत पायावर आणि विशेष चौकस रीतीनें होऊन, त्याचा खरोखर शास्त्रदृष्टीनेंच विचार झाला पाहिजे. कारण, जावत्कालपर्यंत हा प्रश्न

परिपक्वदशेप्रत पोहोंचला नाहीं; किंवा त्याचा सर्वबाजूनीं विचार झाला नाहीं; अथवा साधक बाधक कारणांसहित तद्विषयक कायमचें मत ठरलें नाहीं; तावत्काल-पर्यंत हा प्रश्न अजून देखील बाल्यावस्थेंतच आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

रे. क्याल्ड्वेल्प्रमाणें द्राविडी भाषेचे नऊ प्रकार

आतां, द्राविडी भाषांस अनार्य शाखेंतील कल्पून, त्यांचे एकंदर नऊ प्रकारचे भेद असल्याचें रे. क्याल्डवेल् समजतात. सदरहू भेद खालीं लिहिल्याप्रमाणें होत.

१ तामिल.
२ तेलगू.
३ कानडी.
४ मल्याळी.
५. तुळू.
६ तोड.
७ कोट.
८ गोंड.
९ खोण्ड.

अनार्य भाषेचे अन्य पोटभेद.

ह्याशिवाय, १ रामोशी, २ लंबाडी, ३ कोरवड, ४वडारी, ५मलेअरसर, ६कोल. ७ सूर, ८ बोडो, ९ धिमाल, १० संताळ, ११ ओराणी, १२ राजमहाल,

आणि १३ **ब्राहूई**, इत्यादि पोटभेद देखील **अनार्य** भाषेच्या वर्गांतच मोडतात, असा त्यांचा अभिप्राय आहे. सबब, त्या सर्वांचाच यथावकाश तपशील देऊन, तत्संबंधीं अवश्य तें विवेचन करूं.

द्राविडी भाषांत तामिल अग्रगण्य.

**द्राविडी** भाषांचे जे मुख्य **नऊ** प्रकार सदरीं लिहिलेले सांगितले, त्यापैकीं **तामिलही** निःसंशय अग्रगण्य होय. कारण, हींत पौराणिक शब्दांचा मोठा भरणा असून, हिच्यांतील रसवत्ता आणि भाषासौन्दर्य, हीं खरोखरच विशेष नांवाजण्यासारखीं आहेत.

तामिलचे दोनभेद.

१ **तामिल भाषेचे** बहुतकरून दोन भेद मानण्यांत येतात. १ **पौराणिक तामिल**, आणि २ **लौकीक तामिल**. पहिली प्राचीनकाळीं प्रचारांत असलेली **तामिल** भाषा होय; व दुसरी सांप्रतकाळीं लोकोपयोगांत असलेली **तामिल** भाषा समजावयाची. पहिलीस **शेन तामिल** ह्मणतात, आणि दुसरीस **कोडून तामिल** अशी संज्ञा आहे. हे **तामिल** भाषेचे दोन्ही प्रकार एकमेकापासून फारच भिन्न

---

१ एतद्विषयक माहिती **काल्डवेलकृत द्राविडी** व्याकरणांतून जितकी उपलब्ध झाली, तितकी मीं कृतज्ञतापूर्वक घेतली आहे. ( ग्रंथकर्ता. )

असल्या कारणानें, त्यांस निरनिराळ्या भाषा ही समजण्यास हरकत नाहीं.

तामिलची व्याप्ति.

**तामिळ** भाषा बऱ्याच विस्तृत प्रदेशांत चालू असल्याचें दिसतें. **कर्नाटकांत**, व **पुलकित** पासून तों तहत **कन्याकुमारी** पर्यंतच्या प्रदेशांत, तसेंच **दक्षिण हिंदुस्थानां**तील **घांटा**-वरील **बंगाल**च्या उपसागरापर्यंतच्या प्रांतांत, **त्रावणकोर**च्या दक्षिणेकडील **त्रिवेन्द्रम** पर्यंतच्या सरहद्दींत, आणि **सिंहलद्वीपांत** बहुतकरून सर्व ठिकाणीं, हीच भाषा बोलतात. **मद्रास** इलाख्यांत लष्करी टापूंत **तामिल** भाषेचाच प्रचार असून, ज्या कित्येक ठिकाणीं अन्य भाषा परिपाठांत आहेत, तेथें देखील हिचाच विशेषें-करून लोक उपयोग करीत असल्याचें दिसतें. उदाहरणार्थ, **बंगलोर** प्रांतांत **कानडी** चालते; तरी तेथें **तामिल** बोलतात. **बिलारीस** व्यावहारिक भाषा **तेलगू** आहे; तथापि, त्या ठिकाणीं सुद्धां, लोकांच्या बोलण्याचालण्यांत **तामिल**चा बराच उपयोग होतोसें वाटतें. **सिकन्दराबादेस हिंदुस्थानी** प्रचारांत असूनही, तेथें व्यापाराची हालचाल असल्या ठिकाणीं **तामिल**च बोलतात. आणि **कानपूर** येथें **मल्याळी** भाषा चालत असून देखील, तेथें-हीं **तामिल**चाच उपयोग करितात.

सिंहलद्वीपांत तिचा प्रवेश.

**सिंहलद्वीपांत**, व विशेषतः ह्या द्वीपाच्या उत्तरेकडील प्रदेशांत, **तामिळ** लोकांची वस्ती फार प्राचीन काळापासूनच झाली असल्याचें दिसतें. किंबहुना, आज सुमारें दोनहजार वर्षांपलीकडील कालांतच त्यांनीं ह्या द्वीपांत आगमन करून, आपल्या वसाहती वसविल्या असाव्या, असें वाटतें. हल्लीं तर ह्यांची वस्ती बरीच वाढली जाऊन, ते **सिंहली** लोकांवर ही दिवसानुदिवस आपला पगडा बराच बसवीत चालले आहेत. कारण, **काफी**ची लागवड करणाऱ्या मजुरांचा भरणा **तामिळ**पैकींच असून, व्यापार धंदा, व्याजबट्टा, नोकरीचाकरी, इत्यादि सर्व खातीं **तामिळां**नींच व्यापून टाकिली आहेत. त्यामुळें कदाचित् **सिंहलीं**चे सर्व धंदे हिसकावून घेऊन, ते ह्यांस थोडक्याच कालांत हतवीर्य करतील कीं काय, अशी भीति सहजीं वाटत आहे.

आशियांत व आफ्रिकेंत तिचा प्रसार.

**पेगु, पिनांग, सिंगापूर, मरीचि** ( मॉरिशियस ), इत्यादि ठिकाणीं ज्या धाडसी आणि साहसी **हिंदूं**नीं फार प्राचीन काळापासून आपली वस्ती केली आहे, व वसाहती वसविल्या आहेत, त्यांत देखील **तामिळ** बरेच असल्याचें कळून येतें. आणि ह्मणूनच ह्यांस **प्राची**दिशे-

कडील **ग्रीक** किंवा **स्कॉच,** असें कित्येक पाश्चात्य सकौतुकाश्चर्य ह्मणतात.

तामिलची उत्पत्ति.

असो. **तामिल** शब्द "**तामीर**" पासून झाला असल्याचें दिसतें. आतां, कदाचित् हा शब्द "रलयोः सावर्ण्यम्," या न्यायानें 'र'च्या ठिकाणीं 'ल' होऊन, झाला असावा; अथवा मूळ शब्दाचा अपभ्रंश होऊन, हें सांप्रतचें रूप त्याला प्राप्त झालें असावें.

शेनतामिलांत तेलगु व कानडी शब्दांचा भरणा.

तामिलांत, "**शेन-तामिल**" आणि "**कोडुन तामिल**" असे दोन प्रकार असल्याचें पूर्वीं सांगितलेंच आहे. पहिल्यांत अपरिचित व प्रचारांत न येणाऱ्या शब्दांचा विशेष भरणा असून, शिवाय **तेलगू** आणि **कानडी** शब्दांचाही त्यांत बराच उपयोग केल्याचें दिसतें. त्यामुळें, त्यांतील भाषेची नैसर्गिक सरलता जाऊन, ती मोठ्या प्रयत्नानें व ओढून ताणून भपकेदार केलेली असावी, असा भास होतो.

---

१. रेव्हरंड क्यॉल्डवेल असें म्हणतात कीं,

"In short, wherever money is to be made, wherever a more apathetic or a more aristocratic people is waiting to be pushed aside, there swarm the Tamilians, the Greeks or Scotch of the east, the least scrupulous and superstitious and the most enterprising and persevering race of Hindus."

( Rev. Caldwell's Dravidian Grammar. P. 5 ).

ह्याचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे, **संस्कृत** शब्दांचा होतां होई तोंपावेतों, बिलकुलच उपयोग न करण्याकडे **द्राविड** कविगणांची प्रवृत्ति होय. किंबहुना, तसें करण्याविषयीं त्यांचा विशेष कटाक्ष आणि दुराग्रह तरी खचितच होता, असेंही म्हणण्यास हरकत नाहीं. तथापि, ह्याचा अचुक परिणाम असा झाला कीं, त्या योगानें ह्या भाषेचें (**शेनतामीलचें**) सहजसौंदर्य व मुग्धविलास हे नाहींसे होऊन, त्याऐवजीं तिच्यावर अपरिचित आणि कृत्रिमालंकार मात्र चढले.

त्याची कालमर्यादा.

याप्रमाणें, **शेनतामिलांत**, इ. स. च्या आठव्या शतकापर्यंत, **संस्कृता**व्यतिरिक्त अन्य शब्दांची जेवढी भर पडावयाची होती, तेवढी पडत गेली. परंतु, अशा प्रकारची दांभिक व कृत्रिम भाषापद्धति दिवसानुदिवस सामान्य जनास बहुतेक नापसंत झाल्यासारखीच होऊन, तींत बराच फेरबदल होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. कारण, कित्येक कविकुलगुरूंनीं तिला लौकिक भाषेंतच सजविण्याचा यत्न केला; आणि कित्येकांनीं तर, तिच्यावर **संस्कृत** शब्दरत्नालंकार चढविले. त्यामुळें, थोडक्यांच कालांत तिजवर अनेक संस्कार होऊन, ती बऱ्याच नांवारूपास आली.

**अस्तु. कोडून**—तामील नांवानें महशूर असलेली जी

कोडून तामिलचा उदय, व त्याचें कारण.

भाषा, तीच ही होय. हींत संस्कृत शब्दांचा विशेष फैलाव, **बौद्ध** आणि **जैन** धर्मांचा प्रसार होत असतांना झाला. कारण, एतद्विषयक मूलग्रंथ **संस्कृतांत**च होते. तथापि, लोकभाषेंतच धर्मोपदेश करण्याविषयींचें ह्या धर्मांचें खरें इंगित असल्या कारणानें, बहुतेक **प्राकृत** भाषा बऱ्याच पुढें सरसावल्या. इतकेंच नव्हे तर, त्याबरोबर त्यांत **संस्कृत** शब्दांचा ही आपोआपच भरणा होत गेला. तदनंतर कालान्तरानें, **श्रीमंत् शंकराचार्य** अवतरले.

बौद्ध आणि शंकरमताचा प्रसार.

ह्यांचा काल अजून देखील कायमपणें निश्चित झाला नाहीं. तथापि, तो. इ० स० च्या आठव्या शतकांतला असावा, असें वाटतें. हे **जगद्गुरू** असून **वेदधर्मा**चे निःसीम आभिमानी होते. सबब, त्यांनीं, हें **बौद्ध**धर्मजाल अखिल **भरतखंडांत**, आणि त्याच्याही पलीकडे पूर्व, पाश्चिम, दक्षिण, व **उत्तर**, या दिशांनीं सर्व **आशियांत** पसरलें आहेसें पाहून, आणि त्यामुळें नास्तिक्य व पाखांडीपणा वाढत गेल्यानें, **सनातन हिंदुधर्मास** कायमचा अपाय येणार, असें मनांत आणून, त्यांनीं त्या धर्मास आजिबातच फांटा देण्याचें योजिलें.

पुढें, योग्य संधी पाहून, **श्रीमत् शंकराचार्यांनीं वाग्युद्ध** चालविलें, व त्यांत **बौद्ध** आणि तदुद्भूत **जैन**

इत्यादि धर्मांचा अजिबात पाडाव करून टाकिला. तद्नंतर, **हिंदुधर्माचें श्रेष्ठत्व** त्यांनीं पुनश्च प्रतिष्ठापिलें, व **शांकर दिग्विजयाचा** झेंडा अखिल **भरतखंडभर** रोंविला. त्यामुळें, **हिंदुधर्मशिक्षणाचा** दिवसानुदिवस अधिकाधिकच प्रसार होऊन, बहुतेक सर्व **प्राकृतभाषांत संस्कृत शब्द** ज्यास्त प्रमाणानें घुसडत गेले.

शेनतामिलचा सुरवातकाल.

ह्यावरून, वाचकाच्या लक्षांत इतकें सहजीं येऊन चुकेल कीं, **लौकीक** अथवा **कोडून—तामिल** इसवी सनाच्या आठव्या शतकापासून प्रचारांत असून, त्यापूर्वीं अनेक शतकें **पौराणिक** किंवा **शेन—तामिलचाच** उपयोग करण्यांत येत असे. किंबहुना, तो इसवी सनापूर्वीं सहाव्या किंवा सातव्या शतकापासून देखील होत असावा, असें वाटतें. कारण, **तामिललोकांच्या** सुधारणेचा काल तेव्हांपासूनच असल्याविषयीं कित्येकांचा[1] अभिप्राय आहे.

तेलगू व तिचे गुण.

**२ तामिल** नंतर दुसऱ्या श्रेणीची भाषा म्हटली म्हणजे **तेलगू** होय. हींत देखील **तामिल** प्रमाणेंच **शब्दप्राचुर्य, प्रसाद,** आणि **व्यंजकता** असल्याचें कळून येतें. तथापि, **पदलालित्याच्या** संबंधानें पाहूं गेलें तर, हींत **तामिलपेक्षांही** ज्यास्त **माधुर्य** आहे, यांत संशय नाहीं.

---

१ रेव्हरंड क्याल्डवेल. त्यांचें द्राविडी व्याकरण पहा.

**तेलगू** हा **तेलंगी**चाच अपभ्रंश असून, **ग्रीक** भूगोलवेत्ते सुद्धां ह्या प्रदेशास **मोदोगलिंगम** म्हणत. ह्यावरून, हा शब्द फार प्राचीन आहे. **तेलंगी** शब्द देखील **त्रिलिंगम्** पासूनच झाल्याचें दिसतें, यांत शंका नाहीं. **तेलंगणास संस्कृतांत आन्ध्र** अशी संज्ञा आहे, आणि पूर्व किनाऱ्याला ह्या देशाची व्याप्ति **पुलिकात** पासून थेट **चिकाकोल** पर्यंत आहे. तथापि, आभ्यन्तरीय प्रदेश याहीपेक्षां ज्यास्त विस्तृत आहेसा वाटतो. कारण, ह्यांत **म्हैसूर, महाराष्ट्** देशाच्या पूर्व सरहद्दीचा भाग, बहुतेक **निजाम**चें राज्य, **वऱ्हाड** प्रांत, **कर्नुळ, नागपूर**चा कांहीं प्रदेश, व **गोंडवण**, यांचा समावेश होतो.

आतां, प्राचीन काळीं, **तेलंगण**ची उत्तरेकडील मर्यादा, याहीपेक्षां पुष्कळ विस्तृत असून, ती थेट **गंगे**च्या मुखापर्यंत देखील गेली असावी, असें खचितच अनुमान होतें. कारण, **आन्ध्रा**संबंधीं लिहितांना, हे लोक **गंगे**च्या तटीं, किंवा **गंगे**च्या मुखाजवळ असल्याविषयीं, **ग्रीक** भूगोलवेत्ते लिहितात; आणि **टॉलेमी, प्लिनी,** इत्यादि देखील असेंच वर्णन करितात.

तेलगूची व्याप्ति.

---

१ प्लिनी हा "मोदोग" शब्दाचाच उपयोग करीत असून, त्याचा अर्थ 'तीन' असा होतो. कानडींत ह्यालाच "मुरु," ह्मणतात. तामिलांत "मुन्ह; आणि अर्वाचीन तेलगूंत "मूडु," असे ह्मणण्याचा परिपाठ आहे.

सर्व **तेलंगण** प्रांतांत तेलगूच बोलतात. तथापि, **चिकाकोलच्या**पलीकडे उत्तरेच्या बाजूला, आणि समुद्र किनाऱ्याच्या लगत्यानें ईशान्य दिशेस मात्र, **उरीय** भाषा प्रचारांत आहे. एकोणीसाव्या शतकाच्या प्रारंभीं जे **युरोपियन** लोक तिकडे गेले, ते **तेलंगी** भाषेला "**जंटू**" म्हणत. हा शब्द **पोर्तुगीज** असून, त्याचा अर्थ मूर्तिपूजक असा होतो; व "**जंटु**" अथवा "**जंटाईल**" हे एकाच मासल्याचे शब्द आहेत.

तेलगूला पाश्चात्यांनीं दिलेलें नांव.

तेलगु भाषा इसवी सनाच्या आरंभींच प्रचारांत होती, असें वाटतें. कारण, त्या भाषेंतील कित्येक शब्दांचा उपयोग, त्यावेळीं इकडे आलेल्या **ग्रीक** भूगोलवेत्त्यांनीं केलेला असल्याचें दिसतें. उदाहरणार्थ, **प्लिनीनें तेलंगणाचें** तत्कालीन नामधेय **मोदोगलिंगम्** असें दिलें असून, "**मोदोग**" हा प्राचीन तेलगू शब्द आहे; आणि त्याचा अर्थ तीन असा होतो. **मोदोगलिंगम्** व **त्रिलिंगम्** हे एकाच अर्थाचे वाचक होत; आणि **त्रिलंगम्** वरूनच **तेलंगण** हा शब्द पूर्वी सांगितल्याप्रमाणें उपयोगांत आला आहे.

तेलगूचा काल.

३ महत्वाच्या प्रमाणानें **कानडी** ही तिसऱ्या शेजेला येते, व हिची व्याप्ति देखील बरीच असल्याचें दिसतें. कारण,

कानडीभाषा, व तिची व्याप्ति.

**म्हैसूर** प्रांत, **निजाम**च्या राज्याचा पश्चिमेकडील मुलूख, **मलबार** किनाऱ्यावरील **कानडी** प्रदेश, **चोलमंडल**, किंवा ज्याला हल्लीं **कारोमांडल** किनारा ह्मणतात त्या बाजूचा **कर्नाटक** प्रांत, आणि **कुर्ग**, इत्यादि ठिकाणीं **कानडी** भाषा बोलतात. मात्र, **निजाम**सरकारच्या राज्यांत कांहीं भागांत, **कानडी** शिवाय, **मराठी**, **तेलगू**, **मल्याळी**, **तुळवी**, **कोंकणी**, आणि **हिंदुस्थानी**, अशा भाषाही प्रचारांत आहेत.

कुर्ग हा कानडीचा पोट भेद.

**कुर्ग** किंवा **कोडग** हा **कानडी** भाषेचाच एकपोटभेद असून, तो **कुर्ग** देशांतले लोक बोलतात. परंतु, कित्येकांचें असें मत आहे कीं, **कोडग**भाषा **तामिल** आणि **मल्याळी**शीं विशेष साम्य पावते; सबब, ती त्यांच्या पोटांतलीच असावी.

कानडीचे प्रकार.

**तामिल** प्रमाणेंच **कानडी** भाषेचे देखील दोन प्रकार आहेत. १ **प्राचीन**, व २ **अर्वाचीन**. मात्र, ह्या दोहोंतील भेदाचें कारण अगदीं निराळें आहे. आणि तें हें कीं, **तामिल** भाषेंतील दोन प्रकारांपैकीं, पहिल्यांत **संस्कृत** शब्दांचा अभाव, व दुसऱ्यांत **संस्कृत**शब्दांचें प्राचुर्य असून, **कानडी** भाषेंतील दोन प्रकार विभक्तिरूपभेदानें झालेले आहेत.

४ **कानडी** नंतर **मल्याळी** भाषेविषयीं देखील दोन

मल्याळी भाषा, व ति-
ची व्याप्ति.

शब्द लिहिणें अत्यवश्य आहे. ही भाषा, **मलबार** किनाऱ्यावरील प्रदेशांत, म्हणजे **पश्चिमघाटा**च्या खालीं, अथवा **मलयगिरी**च्या पश्चिमेकडील भागांत, **मंगलोर** पासून **त्रिवेन्द्रम्** पर्यंत बोलतात. खुद्द **मंगलोरां**त देखील **मल्याळी**-च बोलत असून, तेथें **कानडी** किंवा तुळू प्रचारांत नाहीं. **त्रिवेन्द्रम्** मध्यें मात्र **तामिल** बोलण्याचा परिपाठ आहे, आणि तेथें **मल्याळी** चालत नाहीं. तथापि, दिवसानुदिवस, **तामिल**ला बाजूला सारून, **मल्याळी**ची सरशी होईलसें कठिण दिसतें. उलट, **तामिल**चाच उत्तरोत्तर ज्यास्त फैलाव होण्याचीं चिन्हें दृग्गोचर होत आहेत, असेंही ह्मटलें असतां चालेल.

९ **मल्याळी** नंतर तुळू ही **द्राविड** शाखेंतील नांवा-

तुळू आणि तिची
व्याप्ति.

रूपास आणिलेल्या भाषांपैकीं पांचवी होय. हिलाच **तुळव** अशीही संज्ञा असून, ती **मल्याळी**पेक्षां **कानडी**शीं विशेष साम्य पावते. ही पूर्वीं **कानडा** मुलुखांत कांहीं कालपर्यंत प्रचारांत होती. तथापि, ती सांप्रतकाळीं, **मंगलोर**च्या आसपास मात्र थोडे लोक बोलतात. शिवाय, हिच्यांत अनेकभाषांचें बरेंच संमिश्रण झाल्याकारणानें, तिचा बहुतेक लोप होण्याचीच वेळ आली आहे, असें ह्मणण्यास सुद्धां फारशी अडचण वाटत नाहीं.

असो. द्राविडी शाखेंतील ह्याखेरीज दुसऱ्याही चार भाषा आहेत. परंतु, त्या कोणास फारशा माहिती नाहींत. इतकेंच नव्हे तर, त्यांत वर्णाक्षरें किंवा लेखनपद्धति सुद्धां नाहीं. त्यामुळें, त्या मागासलेल्या आणि रानटी स्थितींत जशाच्या तशाच अजून देखील राहिल्या आहेत. तथापि,-त्यांबद्दलची थोडबिहुत तरी हकीकत देणें इष्ट वाटल्या; वरून, ती येथें देतों.

द्राविडी भाषेच्या अन्य शाखा किंवा पोटभेद.

६ तोड किंवा तुड, ही तुडवार लोकांची भाषा होय व हिलाच तुडव अशी पण संज्ञा आहे. तुडवार लोक नीलगिरि नामक पर्वताच्या डोंगराळ प्रदेशांत राहत असून, ते त्याठिकाणचे मूळचे राहणारे, आणि प्राथमिक स्थितींतलेच असल्याविषयीं कल्पना आहे. ह्यांची संख्या फारच थोडी आहे, व ती सुमारें हजारा जवळ जवळ असेल, असें वाटतें.

तोड भाषा.

तोड भाषा द्राविडी शाखेंतलि असल्याविषयींच कल्पना आहे. कारण, तिच्यांतले पुष्कळ शब्द तामिल भाषेंतीलच आहेत, असें वाटतें. निदान, ते तामिल भाषेंतल्या शब्दांशीं अगदीं निकट साम्य पावतात, याविषयीं तरी मुळींच शंका नाहीं. आणि ही गोष्ट पुढील उदाहरणांवरून वाचकाच्या चांगली लक्ष्यांत येईल.

तिच्यांतलें शब्दसाम्य.

| तामिळ शब्द. | तोड शब्द. | मराठी शब्द. |
|---|---|---|
| यान | आन | मी |
| याम | ओम | आम्ही |
| नी | नी | तूं |
| एन | एन | माझा |
| निन | निन | तुझा |
| इवन | इवन | तो |
| इवंर | इवर | ते |
| नांगु | नांकु | चार |
| आरु | आर | सहा |
| पत्तु | पोथ | दहा |
| नूरु | नूर | शंभर |
| अळ | आळ | मनुष्य |
| अप्पन | अप्पन | बाप |
| मगन | मच्च | मुलगा |
| केइ | कइ | हात |
| काल | काल | पाय |
| कन | कन्नु | नेत्र |
| वइ | बइ | मुख |
| तिंगळ | तिग्गलु | चन्द्र |
| वानम | बान | आकाश |
| नाळ | नाल | दिवस |

| | | |
|---|---|---|
| इरुळ | इरुळ | रात्र |
| नीर | नीर | पाणी. |

कोत भाषा. **कोत** भाषा देखील **तोड** भाषेप्रमाणें, **नीलपर्वताव**रच कांहीं भागांत प्रचारांत आहे. ही भाषा **कानडी**चाच एक पोटभेद आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. मात्र, ती पुराण असून ग्राम्य व असंस्कृत स्थितींत आहे; आणि ती फक्त नीच जातीचे लोकच वापरतात. ह्याशिवाय, **कानडीचा**

बडगर. आणखीही एक प्रकार आहे, व तो **बडगर** नांवाचे लोक बोलतात. तथापि, ह्यांच्या नजीक आसपास राहणारे जे **इरुळर** (ह्मणजे अज्ञातवासांतले

इरुळर व कुर्ब. अथवा रानटी अवस्थेंतले लोक), आणि **कुर्ब** किंवा **कुरुबार**, ( ज्याला **तामिल** भाषेंत **कुरुंबर** अथवा भटकणारे धनगर ह्मणतात ), हे ही भाषा वापरीत नसून, गांवढी **तामिल**चाच उपयोग करितात.

८ **गोन्द** किंवा **गोवन्द** नांवाची भाषा **गोण्डवण**

गोन्द. प्रांतांत चालत असून, ती **नागपूर**च्या उत्तरेकडील भागांत व **सौगुर** आणि **नर्मदा** नदीच्या प्रदेशांत बोलतात. ही **गोन्द** लोकांची भाषा होय.

९ **खोंड** लोकांची निराळीच भाषा आहे, व तिला

खोंड. **खोंड**, **कुंड**, किंवा **कू**, असें

म्हणतात. ह्यांची वस्ती मुख्यत्वेंकरून **गोंडवण, गुमसूर,** आणि **ओरिसा** प्रांताचा डोंगराळ प्रदेश, येथें आहे.

याप्रमाणें, **द्राविड**शाखेंतील मुख्य नऊ प्रकारच्या भाषांचें सामान्य विवेचन झालें. सबब, आतां राहिलेल्या किरकोळ भेदांचें साधारण दिग्दर्शन करून, हा भाग पुरा करितों.

लांबाडी.

**लांबाडी** लोक हे **हिंदुस्थानी** भाषेचाच एक पोट भेद बोलत असून, ते **लमाण** जाती पैकीं असावेत, अशी कल्पना आहे.

रामोशी.

**रामोशी** आणि **कोरवारी** हे एक प्रकारची **तेलगु** भाषा बोलतात.

मलेअरसर व तिची व्याप्ति.

**मलेअरसर** हे अपभ्रष्ट झालेली **मल्याळी** व **तेलगू** भाषा बोलतात. हे **घाटाखालीं** दक्षिणेकडील बाजूला डोंगराळ प्रदेशांत राहतात; आणि कदाचित् ह्याच कारणासाठीं ते आपणांस "**वनचे राजे**" म्हणवितात.

कोल आणि सूर; व तिची व्याप्ति.

**कोल** व **सूर** ह्या भाषा **मध्यहिंदुस्थानां**तील रानटी जाती, आणि **ईशान्य** सरहद्दीवरील जंगली लोक, यांच्या प्रचारांत आहेत. ह्यांत कित्येक **द्राविडोद्भव** शब्दांची भेळ आहे. तथापि, त्या अगदीं निराळयाच शाखेंतल्या असल्याविषयीं कित्येक शोधकांचें मत आहे; व ते त्यांस **तामुली** शाखेंतल्या असल्याचें समजतात.

**बोडो** आणि **धिमाल** नांवाच्या भाषा त्या त्या जातीचे लोक बोलत असून, त्यांची वस्ती **कुमान** व **आसाम**च्या दरम्यानच्या दाट जंगलांत आणि पहाडी प्रदेशांत आहे. ह्यांची भाषा **द्राविडी** वर्गांतली नसावी, असें वाटतें.

बोडो व धिमाल, आणि तिची व्याप्ति.

**मध्यहिंदुस्थानां**तील **राजमहाल** नामक शैलपादावर देखील कित्येक रानटी लोकांची वस्ती आहे; व हे एक निराळीच भाषा बोलतात. परंतु, हिचें साम्य विशेषेंकरून **द्राविडी** भाषांशींच असल्याचें दिसतें.

राजमहाली जंगली लोकांची भाषा.

**संताळ** लोकांची ह्यांच्याहून भिन्न भाषा आहे, आणि ती विशेषतः **कोल भाषे**शीं साम्य पावते. हे **भागलपूर**च्या पहाडांत आपली वस्ती करून असतात.

संताळांची भाषा.

**ब्राहूई** भाषा, **बलुचिस्थानां**त, **खीलत** येथील पहाडी लोकांच्या प्रचारांत आहे; व हींत अनेक **द्राविडी** शब्द, क्रियापदाचीं रूपें, आणि तत्सदृश वाक्पद्धति आढळते. त्या कारणानें, ही **द्राविडी** शाखेंतीलच आहे, असें ह्मणण्यास हरकत दिसत नाहीं.

ब्राहुई भाषा, व तिचें स्थान.

---